


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.






अनुक्रमणिका

विनोदप्रधान

वर्षारंभ विशेषांक

वर्ष २६ वे

मार्च '७० : मूल्य २ रु.

# दीपावली



अनुक्रमणिका



# दीपावली

## विनोदप्रधान वर्षारंभ विशेषांक

मार्च १९७० * वर्ष २६ वे * मूल्य २ रु.

## श्रेयनामावली

आज अचानक गांठ पडे    मुद्दाम विसरून ठेवलेली ध्वनिमुद्रिका.... **प्रभाकर पेंढारकर** ● झिला सिझन नाय.... झिला, करेक्ट टायमाला उभा राह्यलास देवासारखा.... **श्रीराम कदम** सत्ता..... हातून निसटेल म्हणून न्यायाचा मार्ग सोडू नये.... **दादूमिया** ● बाटली, बाई आणि मंडळी.... आधी बाटली सांपडली नि नंतर बाई... **द. शि. खरात** ● मराठीने केला कानडी भ्रतार.... भाषेचा गोंधळ सुकाळाचा.... **सौ. ललितागौरी कवलो** ● गड आला नि सिंहही आला.... गुलाबी स्वप्ने रंगविण्याचे दिवस जंगलात गडप... **राजा राजवाडे** ● इडली चटणी.... तोंडात घालताच ब्रम्हांड आठवावे    **यशविंद गोडबोले** ● जिणे न माझे लाजिरवाणे.. नटीचे हे वागणे.... **प्रभाकर अत्रे** ● कमाला भरविता असली प्रदर्शने ? **व्ही. एस. गुर्जर**

कविता : **श्रीराम गुळवणे** ● फाशालता याशिवाय दीपमाला, रंगमंच, सन्मानपत्पे, आमचे (हो) एक मत ही नेहेमीची चवदार सदरे

तसेच

रुणझुणती क्षुद्रघंटिका या नव्या सदरात अरे, माइका... सोपानदेव चौधरी

आणि

*** मासिक विंगचित्रमाला ***


टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART

**दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. दीनानाथ दलाल, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीची किंमत २ रु.+रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल-आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन. Registered with the Registrar of Newspapers for India under RN No. 1612/57 DIPAVALI : Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge, Bombay–4.




**दलाल आर्ट स्टुडिओ**
४२, कैनेडी ब्रीज, मुंबई–४
टेलिफोन : ★ तारेचा पत्ता :
३५७७६५ DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५ द्वैवार्षिक वर्गणी रु. २५; त्रैवार्षिक वर्गणी रु. ३० परदेशी वार्षिक वर्गणी रु. २०

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नाव, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-ज्यास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

**साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.
● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

---

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. दीनानाथ दलाल यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले,

## आनंद आणि उमेद—

नव्या वर्षाचा हा पहिला अंक रसिक वाचकांच्या हाती देताना आम्हास अतिशय आनंद होत आहे. माणसाच्या आयुष्याप्रमाणेच मासिकाच्या आयुष्यातही पंचविशीला एक आगळे महत्त्व असते. माणूस रूढ अर्थाने अठराव्या वर्षीच वयात येत असला तरीही 'आम्ही वयात आलो' असे म्हणण्याचा आनंद, म्हणण्यातली समज, म्हणण्यातले दायित्व आणि नव्या उमेदीतून लाभणारी स्वप्नमय तरलता त्याला पंचविशीतच लाभत असते. तसा आनंद **'दीपावली'** गेले वर्षभर अनुभवीत होती. रौप्य महोत्सवाचा आनंद, दायित्व पाहून पूर्ण केलेल्या एका तपाचा आनंद, जे धूसर होते ते साकार झाल्याचा आनंद तेव्हा दीपावलीला झाला होता **'दीपावली'** ही काही एक अमूर्त कल्पना नव्हती. ते काही नुसते एक स्वप्न नव्हते न काही केवळ एक इच्छारंजन नव्हते. तर ती होती एक साधना. एक निष्ठा. तो होता एक सुन्दरतेचा शोध – जीवनातल्या सुन्दरतेचा, कलेतल्या सुन्दरतेचा, शब्दाशब्दातून अभिव्यक्त होणाऱ्या सुन्दरतेचा शोध होता. अन्यथा ह्या स्पर्धेच्या जगात अनेक लादल्या गेलेल्या वा परिस्थितिवश आलेल्या तडजोडी 'दीपावली'ला स्वीकारता आल्या असत्या. आणि त्या स्वीकारल्या असत्या तरीही आजच्या 'सौदा' धर्म मानणाऱ्या जगात त्याबद्दल कुणी **'दीपावली'**ला दोषही दिला नसता. परंतु **दीपावली**ने स्वतःचा तोल जाऊ न देता कला-साहित्य-संस्कृतीचा तोल सावरण्याचा यथामती – यथाशक्ति प्रयत्न केला. तो करताना कुरकुर, तक्रार केली नाही; की क्रांतिप्रवणतेचा आवही आणला नाही. बदलत्या जीवनात व बदलत्या मूल्यांच्या गदारोळातही **'दीपावली'**ने पायरी सोडून काही केले नाही. ताठ कणा सोडला नाही. मासिकाच्या व्यवहारात सारे उत्तमच हाती येते असे नाही. पण जे हाती येते वा प्रयत्नपूर्वक आणविले जाते त्यातले चांगले वा क्वचित प्रसंगी उत्तमही **'दीपावली'**ने वाचकांना पेश केले आहे. नवे-जुने वादात **'दीपावली'** चांगल्याचाच झेंडा खांद्यावर टाकून उभी राहिली. आणि **'दीपावली'**चा पंथ वा पीठ झाले नाही. पंचविशीतल्या तरुणाच्या कुतुहलाने व जिद्दीने **'दीपावली'**ने नवे प्रयोग व नवे प्रयत्न न्याहाळले, रौप्य महोत्सवी वर्षातली कादंबरी स्पर्धा, त्यात आलेल्या कादंबऱ्या, त्यातून मराठी कादंबरीला मिळालेले पेंढारकर, पिंगे, शेणई, हिदायतखानसारखे नव्या उमेदीचे लेखक–कादंबरीकार, गेल्या वर्षातल्या नारायण धारप, अशोक आघरकर, प्रभाकर पेंढारकर, जयवंत दळवी, अच्युत बर्वे यांच्या लघु कादंबऱ्या, पंचवीस वर्षाच्या वाटचालीचे मूल्यमापन करणारे ओंकार, नेरुरकर, साधले, अत्रे यांचे साक्षेपी लेख, रौप्य महोत्सवी दिवाळी अंकातील लावणी-पर्व, विनोदी लेखन स्पर्धा, दादुमिया यांची विवेचक व मर्मग्राही लेखमाला, कालानुरुप व सनसनाटी विषयावरील विगचित्रमाला, राजकीय अस्थिरतेवरील भेदक भाष्ये आणि आचार्य अत्रे, शाहीर अमरशेख, अण्णाभाऊ साठे यांचे वरील गाजलेले मृत्युलेख ही सारी कमाई दीपावलीने रौप्य महोत्सवी वर्षात केली. आणखीही कितीतरी गोष्टींचे उल्लेख स्थलाभावी टाळतो. **'दीपावली'**च्या ह्या 'रौप्य महोत्सवी' आनंदोत्सवाची सांगता जणु ह्या अंकाने होत आहे. रौप्य महोत्सवाच्या वर्षात अनेकांनी अनेक प्रकाराने सहकार्य दिले आहे. प्रस्थापिताविरुद्ध चालू असलेल्या बंडांच्या संदर्भात आम्ही 'जनता व्यासपीठ' उघडले आहे तेही ह्या रौप्यमहोत्सवी वर्षात ! ह्या व्यासपीठावर चालू असलेली 'झोंबाझोंबी' अखेर काही नवे विचारप्रवर्तन करून जाईल असा आम्हास विश्वास वाटतो. विचारमंथनातून येणारे विष पचविण्याची ताकद ज्ञानेश्वर, तुकाराम, नामदेव, नाथांच्या ह्या भूमीत खात्रीने आहे हा आमचा विश्वास आहे. अखेर त्यातून जे अमृत गवसेल ते ह्या समाजाला 'संजीवन' देईल, नवी दृष्टी देईल, नवा आत्मविश्वास देईल असा विश्वास आम्हाला वाटतो.

रौप्य महोत्सवी वर्ष सानंद पार पडले आहे.

नव्या उमेदीने आम्ही सव्वीसाव्या वर्षात पदार्पण करीत आहोत. ह्या 'तरुण धर्मा'ला आपण योग्य तो प्रतिसाद द्याल अशी आशा व्यक्त करतो.

—संपादक






## हे वाङ्मयचौर्य नव्हे !

स. न. वि. वि

आपल्या डिसेंबर १९६९ च्या अंकात श्री. वा. भा. जोशी यांचे "हे देखील 'ग्रेट' च" या शीर्षकाचे पत्र वाचले. पत्र लेखकाचा गैर-समज झालेला दिसतो.

मूळ कथा पंधराव्या शतकातील प्रसिद्ध इटालियन साहित्यिक बोकॅशिओ ह्याच्या "डीकॅमेरॉन" या कथा संग्रहात आहे. त्यावर डॉ. शामसुंदर रघुवंशी व श्री वसंत सवनीस यांनी आपल्या भाषेचा साज चढवून मराठीत उतरली असावी.

प्रसिद्ध जागतिक कीर्तीच्या साहित्याचे भाषांतर करणे हे वाङ्मचौर्य होत नाही. अर्थात मूळ कल्पना परकीय असे नमूद केले असते तर योग्य झाले असते. श्री. वसंत सवनीस यांच्यावर या पत्राने अन्याय होतो असे मला वाटते.

**विलेपार्ले** आपला
**मुंबई–२७** **(डॉ.) पु. ग. बसंक**

## हम सब चोर हैं !

स. न. वि. वि.

'दीपावली'च्या डिसेंबर १९६९ च्या अंकात पुण्याचे श्री. वा. भा. जोशी यांचे पत्र छापून श्री. वसंत सवनीस यांचे एक वाङ्मचौर्य उघडकीला आणले आहे; पण आता वाङ्मयप्रांतातील चौर्याबद्दल कुणी फौजदारी करण्याची आवश्यकता राहिलेली नाही. कारण चोरांचीच बहुसंख्या झाल्यावर कुणी कुणाला पकडायचे ? नामवंत लेखक बरेच वेळा वाङ्मयचौर्य करताना आढळतात, पण ती चोरी आहे असे वाटू नये म्हणून मूळ कथानकाला आपल्या वातावरणाशी जुळेल, शोभेल असा पोषाख चढवितात. आता डॉ. शामसुंदर रघुवंशी यांनी लिहिलेल्या कथेचे आणि श्री. वसंत सवनीस यांच्या कथेचे मूळ अन्यत्र कुठे तरी उघड झाले आहे. पूर्वी 'दीपावली'तून डॉ. कु. दमयंती सरपटवार मिश्कील कथा लिहीत असत. त्यांना पौराणिक वातावरणाचा साज चढविलेला असला तरी कथांचेही मूळ परकीय भाषेतील वाङ्मयात आढळते. इतरांच्या बाबतीतही तसेच आहे. हे कुणी कुणा सांगावे ?

**चेंदणी, ठाणे** **प्रभाकर तुंगेकर**

## अभ्यासपूर्ण प्रबंध

स. न. वि. वि.

जानेवारीचा अंक खूपच लौकर मिळाला. श्री. ज्ञानेश्वर नाडकर्णी यांची कथा' दीपावली'त फार दिवसांनी आढळली. 'जखमी चांदणं' हे शीर्षक तर सुंदर आहेच, शिवाय कथाही झक्क जमली आहे. डॉ. शामसुंदर रघुवंशी यांची कथा मिस्कील आहे. दमयंती सरपटवारांच्या नात्यातलेच हे रघुवंशी दिसतात.

प्रा. नरहर कुरुंदकर यांनी श्री. आनंद साधले यांच्या 'महापुरुष' कादंबरीवरील परीक्षणाच्या निमित्ताने एक अभ्यासपूर्ण प्रबंधच 'दीपावली'च्या वाचकांना सादर केलेला दिसतो. जगात कित्येकांना लाभलेले मोठेपण हे त्यांचे दुर्दैवच होय, त्यातच 'कर्णा'चाही समावेश होतो. प्रा. कुरुंदकर यांनी या त्याच्या मर्मावर नेमके बोट ठेवले आहे. शिवाय मूळ कादंबरीत श्री. साधले यांनी कर्णासंबंधी काही नवीन प्रमेये मांडली आहेत, त्यांचाही पाठपुरावा प्रा. कुरुंदकर यांनी केला आहे, त्यावर कदाचित कुणी विद्वान अधिक चर्चा करील तर आमच्यासारख्या सामन्यांच्या ज्ञानात भर पडेल.

विनोदी साहित्य स्पर्धेतील तिसऱ्या क्रमांकाच्या दोन्ही कथा बऱ्या वाटल्या. त्यातल्यात्यात 'भान-गडची सहल' उजवी वाटली.

'दीपावली' लौकरच २६ व्या वर्षात पदार्पण करणार आहे, त्याबद्दल मन:पूर्वक अभिनंदन आणि 'दीपावली'ची उत्तरोत्तर भरभराट होवो ही सदिच्छा !

**कर्जत** **राजाराम प्र. विवलकर**

## परिसंवादाचे स्वागत

स. न. वि. वि.

निरनिराळ्या विषयांवरील परिसंवाद हे 'दीपावली'चे वैशिष्ट्य अलिकडे अभावानेच आढळत असे; पण जानवारी अंकातील 'प्रस्थापितांविरुद्ध बंड' या परिसंवादाचा प्रारंभ वाचून आनंद झाला. डॉ. अनिल अवचट आणि श्री. श्रीकांत सिनकर



यांचे लेख या परिसंवादात आहेत; पण त्या दोन्ही लेखांतील विषय मात्र निरनिराळे आहेत. आपण जाहीर केल्याप्रमाणे जीवनाच्या निरनिराळ्या क्षेत्रांमधील प्रस्थापित आणि बंडखोर यांचे अंतरंग [illegible] मिळाले तर वाचकांचे भाग्यच! परिसं[illegible] रंगावा असे प्रारंभावरून तरी म्हणावेसे वाटते.

पॅरीसला सुकान्त चंद्राननेची दिलेला उपमा पाहून गंमतच वाटली. श्री. उर्सेकर यांनी पॅरीसचे वर्णनही ललितमधुर शब्दात केले असून त्यामुळे त्या मोहमयी नगरीचे चित्र डोळ्यांपुढे उभे राहाते. 'कुंडे कुंडे नवं पयम्' ही चावट कथा या अंकात आहे, त्यावर टीकेचे वादळ उठण्याचा संभव आहे.

डिसेंबरच्या अंकातील आपल्या 'चित्र-गुप्त' यांचे 'चक्रावर्त' नाटकावरील समीक्षण वाचून मुद्दाम ते नाटक पाहिले: पण त्या नाटकाचे कथानकच नीटसे उमगत नाही, त्यामुळे विरस होतो. प्रयोगाचे नेपथ्य नव्या प्रकारचे असल्याने बरे दिसले, पण त्यातले संकेत सामान्य प्रेक्षकांना कळणे कठीणच आहे. नाटक हे प्रेक्षकांसाठी असावे की नसावे असाच प्रश्न हे नाटक पाहून माझ्यासारख्या अनेकांपुढे उभा राहिला असेल. सिंडिकेट आणि इंडिकेट यांची कॉंग्रेस अधिवेशने नुस्तीच अहमदाबाद आणि मुंबईत होऊन गेली. त्यांच्यावरील आपली व्यंगचित्र खरोखरच फार बोलकी आहेत. 'गरीब माणसा'बद्दल उभय गटांना सध्या कसा पुळका आलेला आहे याचे विदारक चित्रच आपण या व्यंगचित्रांमधून रेखाटले आहे.

**विलेपार्ले** **–शरयू मेढेकर**
**मुंबई-५७**

# झिला सिझन नाय

श्रीराम कामत



...मोठा आजा हिला म्हणाला, "चल बये, तूस घरलां पोचवून देतो...." म्हटल्या शिवाजीराजांनं मुसलमान सुभेदाराच्या सुनेला खणानारळी कडून असंच पोचविलं होतं–" ...मी मात्र मुठी आवळीत तळमळत पडलो...

माझं नाव झिला.

म्हटल्या वडखोलच्या फटू गावड्याचा मी लेक. गेले साताठ महिने वेंगुर्ल्याला कालीज करीत होतो. मसणं तेच हो–प्री डिग्री का काय? म्हटल्या पहिल्या वर्सालाच बघा!

तुम्ही पुसाल हे कसं झालं?

म्हटल्या मी म्हणेन हे असंच व्हायचं. हे असंच होत आलं आहे. तरी शेदिडशे वर्स.

आम्हा वडखोलच्या गावड्यांचा मूळ पुरुष भाग नवस नाही का? तर ह्याचा बैल रानात एक दिवस चुकला. सांजच्या पारी हा मारे तो हुडकत होता. म्हटल्या पुढ्यात ही आवा, पुशा घोगळ्याची नंबर तीनची बायको. औराच्या पाण्यासारखी तुडंब खळखळत होती. बाहेर फुटायला पाणी काठोकाठ रीघ बघत होतं. तर भाग नवस बैल विसरला आणि आपला हिच्याकडेच लाळ घोटत बघत राहिला.

तसं कुमुनुमु पाणी उसळलं, "लसपस लांबढेंग्या, काय रे बघतूस मस?"

निखळून ह्यानं जाब केला, "चिखलातल्या चिखलबोडे, काय गे सांगू तूस?"

आवा निमुक हसली. भागाच्या मिठीत उसासली, "गुंजेवरल्या भावजींनू, मस नाय हूं बोल!"

भाग नवस पाण्यातील ढपळासारखा अख्खा विरघळला, "व्हय, व्हय निळ्या वैनी माजेबी हेच हाल!"

रातला मशाली लावून रान उठवीत उभं गाव लोटलं. तर रानकन्याच्या पडक्या देवळाच्या दारात ही दोघं. घोगळ्यांची कंपनी कोयतेकुऱ्हाडी उगारून धावली. हीच ओरडली, "मारा, जाळा, तोडा–पुन वरूबरच, एकदम."

म्हटल्या पंचायतीला पंचाइत झाली. होय नाही करीत दोघानाही तिनं वाळीत टाकलं. गावातून भायरी केली.

भाग नवस गड्बजला, "ह्या कोंडात तुम्हीच मरा. नालायक नाय जालू आम्ही. नवं गाव काडू. तिकडे उंचावर–"

आणि गावातलं खोपाट मोडून भाग नवसानं ते भरडावर उभं केलं. एकदम उंचावर. कोसावरूनही गमावं अशा जागेवर.

मोठा आजा सांगायचा, त्या दिसापासून वडखोलात भरडावरचा गावडा आणि कोंडातला घोगळा ह्यांच्यामधून अजिबात इस्तू जाईनासा झाला. गावात गावडा नेहमीच उंच राहिला, वरचढच राहिला. रहाणारच. तसं जो मानणार नाही तो भाग नवसाच्या बिजाचा नव्हे. एक हा इभ्रतीचा प्रश्न आली की गावडा इरेला पडला नाही असं कधी झालंच नाही. म्हटल्या मग नाळीची साल सोलून तो टाळीला बांधील आणि भाडासारखी मळभात थाळी पिटीत राहील,



अनुक्रमणिका

गळ्यात मोहनमाळ, घोड्ळ्यावर स्वार
तो गावडोजी गावकार, वायहो गावडोजी गावकार गाजी."

वडखोलात गावड्यांच्या अब्रूचे हे दहा खंडीचे खापर तूर्त मोठ्या आज्याच्या माथ्यावर होतं. आता ह्याचं वय झालं होतं. पण म्हातारा बाकी खबरदार होता. मान तट्ट, नेसण घट्ट. जरा धोरणाला लवाथवा. पण बावलीकाका कानाशी होता. आणि ह्याच्यासारखा बेरकी उभ्या वडखोलात दुसरा नव्हता.

म्हटल्या गावड्यांच्या कुळात पहिला यसयसशी मीच बघा. आणि म्हणून जलमाच्या बाला झालं नाही इतकं कुतुक मोठ्या आज्याला झालं. आवाठ्याकडून ह्यानं पट्टी काढली. माणूस धाडून वेंगुर्ल्याहून मणभर पेढे आणले. तडाम तुडुम तासा वाजवीत म्हातारा सबंध गावाला पेढे वाटायला निघाला. तर अपशकुन! ह्याच्या आधीच कोंडातला ज्ञानू घोगळा सातेरीच्या देवळात हजर होता. देवीला केळी ठेवून हा सांगणं करीत होता, "बाये, पोराला कालीजात धाडतूं. सांबाळून घे."

मोठा आजा गाभाऱ्याच्या पायरीवरूनच देवीला हात जोडून मागं फिरला. तडक घरला आला आणि खळ्यात कांबळं पांघरून स्वस्थ पडून राहिला. हां नाही, हूं नाही. एकदम ताठ.

आवाठा जमला. लोकं बावापुता करू लागली. तोंडून हा ब्र काढील तर हराम!

बावलीकाका भरली गडगुडी घेऊन धावला. म्हणाला, "आज्या, नळी नाय घेतलीस!"

ह्यालादेखील जाब मिळाला नाही.

माझा बा बोलला, "आमच्यात तू जाणता, वडील काय –"

छा:! कांबळ्याला फक्त एक झटका.

"काय चुकलंमाकलं असलं –" निरांकारच हे अशी खात्री झाली तशी चारचौघं ह्याच्या पायाशी नाकं घासू लागली.

हे असं नाटक एकूण ऐन रंगात होतं. तर मी आलो. म्हटल्या शाप गाढवापास्ट गाढव मी. म्हणून तर एकदम मोठ्यानं गळा काढला, "मोठ्या आज्या रे –"

म्हटल्या अंगावरचं कांबळं झटकून मोठा आजा ताडकन उठला. मला उचलून ह्यानं सरळ खांद्यावर आदळलं. तो थयथय नाचू लागला, गाऊ लागला, "झिला तो झिला माजा, झिला तो झिला."

बावलीकाका डोळे बारीक करीत बोलला, "झिलाचं कौतुक पुरे हां! त्या घोगळ्याचंबी एक पोरगं यसयसशी जालं म्हणतात."

मोठा आजा पुरा अवसानात. तो ओरडला, "त्यांस म्हुणावं आमचावी झिला कालिजात जाणार."

"कालिजात-?" माझा बा केकाटला, "आज्या पोरगा जड नाय मस. आन् जालाच तर तळ्यात ढकलीन."

मोठा आजा थोडाच दाद देणार. तो म्हणाला, "फट्या, तुज खरं. हातातोंडाला आलेलं पोरगं फुकाट जाणार. पुन विलाजच नाय रे! घोगळा कालीजात जातू आन् गावडा नाय म्हटल्या गावात लोकं तोंडात शेण नाय घालणार आमच्या!"

आपला लेक गावड्याच्या नावासाठी कामी पडणार ह्याचं माझ्या बापा अप्रूप झालं. त्याची छाती चार इंच फुगली. मान वाघासारखी ताठ झाली.

"कालीजाला कायबाय पैका लागेल तो आवाठा दील. पट्टी काढून." बावलीकाका व्यवहार बोलला.

तितक्यात माझ्या बाला आठवण झाली, "माझ्याकडे एकूच बैल रे आज्या. पोराला जोतास जुपीन म्हणत होतू अवंदा –"

"मस जूप. मी अज्जून उबा हाय रे फट्या –" मोठ्या आज्यानं धीर दिला.

* *

म्हटल्या हे असं झालं.

असंच होत आलं आहे. भाग नवसाची काळी दर पिढीत अशीच एखाद्याच्या तरी टाळक्यात फुटायची. म्हणून कुरकुर करील तो फुटक्या कपाळाचा.

गणपती पोचवतात तसा वाजतगाजत आवाठकरांनी मला गावाच्या वेशीवर नेऊन सोडला. आणि डोळे पुसत ते मागं फिरले.

मीदेखील मोरयासारखा गटंगळ्या खात वेंगुर्ल्याच्या या कालिजात बुडालो. सवय होईस्तो चार दिवस जरा जड गेले. पाण्यात बुडत होतो. कान फुटून जात. डोचकं उठून जाई. जीव नुसता गुदमरून जाई. लै म्हटल्या लै पाणी–पास्ट माथ्यावरनं कुठच्या कुठं जायचं.

कालीजात एक बाकी बरं असतं. हिंयं मास्तर, म्हटल्या प्रोफेसर डोळे झाकतो आणि मग तोंड उघडतो. म्हटल्या समोर मेजावर डोकं टेकून निजा काढायला मी मोकळा होतो. नाहीतरी अभ्यासाकडे लक्ष द्यायचं मला कारण नव्हतं. आम्हा गावड्यांना हो कोण दीय शिकवणार? जे ज्ञान जलमभर बुकं शिकूनही बाकीच्यांना येत नाही ते आम्हाला जलमाचंच असतं. आणि काय बाय जे नाही त्याची गावड्याला जरूरत नाही.

म्हटल्या नाताळच्या सुट्टीच्या दहापंधरा दिवस आधी.

टकल्या डिसोझाची इंग्रजीत रेकॉर्ड लागली होती–माझा नेमच होता. शेवटच्या रांगेत खिडकीकडल्या बाकड्यावर कोंबड्यासारखा मान मोडून मी पडलो होतो.

तर बाहेर कुत्र्यांना जोर आला. ती बोभाटत उठली. त्यांच्या केकाटण्यानं माझी नीज उडाली ही मात्र शरमेची गोष्ट होती. सांगायची सोयच नव्हती. गावात कळतं तर तोंड दाखवणं कठीण होतं.

आणि निजविज अर्धवट झाली की गावडा मग माणसात नाही.

एक खणखणीत शिवी बोलून मी ताडकन् उठलो. समोर मेजावर दोन पुस्तकं, वह्या–हाताला काय लागलं ते उचललं आणि हाणलं एकेक खिडकीतून बाहेर.

"यू देर व्हाटारयू डुईंग?" टाळक्यावर घागरभर थंड पाणी पडलं की जसं होतं तसं परकी भाषेतील त्या चार शब्दांनी माझं झालं. म्हटल्या मी भानावर आलो.

वर्ग नुसता खिदळत होता. प्रोफसर डिसोझाचे डोळे बेडका सारखे तट्ट फुगले होते.





अनुक्रमणिका

"डॉग्स ऑर्डिंग सर." मी बोललो. हे मात्र आश्चर्य! मला फाडफ्रॅड इंग्रजी बोलता येत होतं. "आय फेक्ड बुक्स विन्डोबाहेर."

पुन्हा वर्गात एकच गलका. डिसोझासुद्धा मिशीतल्या मिशीत इंग्रजीत हसला, "विल्यू प्लीज गेट आऊट मिस्टर."

"नो मिस्टर सर. ओन्ली झिला गावडे." मी म्हणालो.

तोंडावर हात घेऊन प्रोफेसर हसत बोलला, "वेल, गो नाव!"

"व्हेअर सर?"

"गो टू हेल." डिसोझानं परवानगी दिली.

"थ्यान्क्यू–थ्यान्क्यू सर!" मनापासून मी आभार मानले. इंग्रजीत घराला हेल म्हणतात हे मला नक्की माहीत नव्हतं. दुसरा तरी काय अर्थ असणार?

दारावरच द्वारपाळासारखे हे उभे होते. मोठा आजा आणि बावलीकाका. माझी पुस्तकं न् वह्या बावलीकाकाच्या हातात होती. म्हटल्या कुठली कुत्री न् काय? बावलीकाकाचे ते उद्योग होते.

ह्यांना पाहिलं आणि माझ्या काळजाचा वडा झाला. नक्की काहीतरी घोटाळा होता. मोठ्या आज्याच्या मिशांचे आकडे खेकड्याच्या डेंग्यांसारखे उघडले होते. नजर नारळ्या ढोरासारखी ताठ होती. बावलीकाका कोल्ह्यासारखा कान फटकारून उफराट्या [illegible]ऑनी बघत होता. कालीजात मी निजा काढतो ही बातमी ह्यांच्या कानावर गेली होती. म्हणून खात्री करून घ्यायला ही जोडी आली होती. तर बेस खात्री झाली होती.

आता? आटपाट, धर माझी पाट–दुसरं काय?

दोघांच्या अंगावरूनच मी सरळ धडक मारली.

मोठा आजा कडकला, "झिला–"

बावलीकाका साखर पेरू लागला, "मेल्या जरा [redacted] घे"

पण मी थांबतो कशाला?

तेव्हा उधळलेल्या बैलाला अडवतात तशी 'हा हा' करून ह्यांनी माझी कोंडी केली.

मोठ्या आज्यानं रागानं हात उचलला.

पण बावलीकाकानं तो धरला. माझी पुस्तकं पुढं करीत म्हटलं, "ही इस्टेट संभाळ."

"राहू दे. कालीज नाय जमायचं मस." मी माझं शस्त्र उपसलं.

"नाय तर सोड." मोठा आजा धापा टाकीत बोलला, "नायतरी घोगळ्यानं सोडलंच नाय!"

बावलीकाकाने बार काढला, "मेल्या तू निजा काढल्यास. तिकडे कालीजवाल्या घोगळ्यानं भानगड केली, पोरगी गटवली."

"आं! आं!" माझं तोंड सताड उघडं पडलं.

"आं–आं काय?" मोठ्या आज्याचा पारा चढला. "नुसतीच पोरगी नाय! सरदार घराण्यातली... गावड्यांना तोंड नाय व्हायलं गावात झिला!"

[पान ६६ वर पहा]



अनुक्रमणिका

# अरे; माईका!



—सोपानदेव चौधरी

त. वडोद्याचे मराठी साहित्य संमेलन होते. विषयनियामक कमिटीची रुक्ष भाषणे ऐकता ऐकता आम्ही कटाळलो. अखेर एक दोघेजण सभागृहाच्या बाहेर आलो. पान खाण्याच्या अन् सिगारेट ओढण्याच्या निमित्ताने उभे होतो. तेवढ्यात आमच्या कानांवर आहे, नाही, वाटते, पाहिजे, नको अशी फक्त क्रियापदेच आदळत होती. पाच-दहा सेकंदांच्या अंतराने ही क्रियापदेच का ऐकू येतात याचे मला आश्चर्य वाटले. सभागृहाच्या बाहेर लाऊडस्पीकर्स (म्हणजे कर्णे, इति—मामा वरेरकर) लावलेले होते. आत सभागृहात जातो तो एक विद्वान् साहित्यिक माइक समोर बोलत होते. वाक्याला सुरुवात होताच भोवतालच्या श्रोतृगणांकडे मान फिरवून व हातवारे करीत बोलत होते, आणि वाक्य संपायला आले की फक्त क्रियापद उच्चारण्याच्या वेळी माईकजवळ तोंड नेत होते, माइकला तोंड देत होते. त्यांची क्रिया श्रोतृगणाला दिसत होती आणि क्रियापदे तेवढी विशेषतः दूरच्या श्रोतृगणाला ऐकू येत होती.

त्याच संमेलनांतील आणखी एक प्रसंग. एक व्याकरण व्यासंगी तर माईकचे नरडे हाती धरून मराठीत येणाऱ्या अनावश्यक अनुनासिकांसंबंधी नाकातून बोलायला लागले. त्यांच्या घोंगावणाऱ्या गेंगाण्यतेने खूपच विनोद निर्माण झाला. व्याकरणासारखा रुक्ष विषयदेखील विनोदी ठरला. निरनिराळ्या सभासंमेलनांतही असे कितीतरी प्रसंग घडले, त्यातील ही एक झलक ! त्यावेळी माइक सेन्स म्हणून जो म्हणतात तो फारच थोड्यांना होता. आपण माईकशी बोलतो त्याप्रमाणे माईकही आपणाशी बोलायला हवा. हे भल्याभल्यांनाही कळत नसे !

त्यानंतर दोन तीन वर्षांनी ऑल इंडिया रेडिओकडून मला काव्यगायनाचे निमंत्रण आले होते. सोबत कार्यक्रमासंबंधीचे करारपत्र जोडलेले होते. ते पत्र वाचून मी आश्चर्यचकित झालो. रेडिओवर कविता गाण्याचा माझा तो पहिलाच प्रसंग. आपल्या कविता दूरदूरच्या लोकांना ऐकवायच्या म्हणजे काय चेष्टा आहे? मी जरा बावरलोच; परंतु यापूर्वी माझ्या चार सहा कविता कोलंबिया ग्रामोफोन कंपनीने ध्वनिमुद्रित केलेल्या होत्या. तो अनुभव माझ्या पाठीशी होता यामुळे तेवढाच धीर आला. मी नाशिकहून मुंबईस आलो. ऑल इंडिया रेडिओ केंद्राची सुरुवात प्रथम बॅलर्डपियर येथील एका इमारतीत झालेली होती. एका मोठ्या हॉलमध्ये ध्वनिक्षेपणाची व्यवस्था केलेली होती. त्याच्याच बाजूला चारपाच खोल्या ऑफीस वगैरेसाठी होत्या. त्यावेळचे श्री. दिनकरराव अमेंबल आणि श्री. आनंदराव ढोलेकर हे दोन अधिकारीच मला आठवतात. दिनकरराव अमेंबल यांचे नाव ऐकण्याच्या अगोदर ते मला एक पारशी तरुण वाटले होते. परंतु त्यांच्या तोंडून मुलायम असे शुद्ध मराठी ऐकले तेव्हा ते महाराष्ट्रीय आहेत हे ध्यानी आले. रेडिओवरील अर्थातच् माझा तो पहिला कार्यक्रम होता. त्याच वेळी आणखी काही गाणाऱ्या कलावंतांचेही कार्यक्रम होते. तेही ह्या हॉलमधे येऊन बसले होते. त्यात सरस्वती माने (राणे), बाल गायक फिरोज दस्तुर, आणखी कुणीतरी गायिका आणि एक भजनी गायक एवढी मंडळीं आठवते. 'गातांना स्थिर बसावे. माइकमधे किती अंतर ठेवावे, माइक समोरून मान हलवू नये'—वगैरे सूचना ढोलेकरांनी आम्हाला दिल्या. मला वाटते पहिल्या प्रथम मीच काव्यगायनाला बसलो होतो. ढोलेकर हळूच माझ्या कानात म्हणाले, "सोपानदेव ! सूचना दिल्याप्रमाणे कविता म्हणा. इतर कार्यक्रमासारखा हा कार्यक्रम नाही. हा रेडिओ कार्यक्रम आहे. तांबडा दिवा लागताच सुरुवात करा." (त्यावेळी ढोलेकर मला एखाद्या देवदूतासारखे वाटले.) श्वास रोखून मी बसलो. लाल दिवा लागताच मी काव्यगायनाला सुरुवात केली. शब्द आणि स्वरासहित कवितेच्या एकेक ओळी माइकने गिळून टाकल्याच पाहिजेत याची खबरदारी घेतली. ठराविक वेळांमधे दोन कविता मी व्यवस्थितपणे गायिल्या, लाल दिवा बंद झाला. "उत्तम", असा अभिप्राय ढोलेकरांनी दिला. मला हायसे वाटले. त्यानंतर सरस्वती राणे, फिरोज दस्तुर यांचे कार्यक्रमही उत्तम रीतीने पार पडले आणि मग भजन गाणारे गायक मारुतराव पहेलवान, (त्यावेळचे स्टंट पिक्चर्स मधील सिनेनट) उठले. माइक समोर बसताच विटेवरी उभा राहिलेल्या विठ्ठलाला नमस्कार करावा त्याप्रमाणे स्टॅंडवर उभ्या राहिलेल्या माइकदेवाला त्यांनी नमस्कार केला. गातानाही धृपदावर येताना माइकला नमस्कार करीत भजन संपविले. पहेलवान आणि भजन ! या आश्चर्यासहित 'धाव पाव सावळे विठ्ठबाई', हे भजन बुवांनी बुलंद आवाजात आर्ततेने गायिले. हे सर्व कलावंत आपापले कार्यक्रम संपवून

अनुक्रमणिका





निवून गेले होते; परंतु कां कुणास ठाऊक ढोलेकरांनी मला शेवटपर्यंत बसवून घेतले होते. त्या निमित्ताने इतरांची गाणीही मला समक्ष ऐकता आली. शेवटी आणखी एक गायक पुढे सरसावले. (त्यांचे नाव मला स्मरत नाही. पुढे ते चमकलेही नाहीत) त्यांनी तर माइकला नमस्कार केलाच, परंतु साथीदार-साजिंद्यानाही वाकून नमस्कार केला. अस्ताई गाता गाता काय झाले कुणास ठाऊक त्यांच्या आवाजात कंप निर्माण झाला. माइकचीच त्यांना भीती वाटली असावी. भीतीमुळे शब्दोच्चार अस्पष्ट होऊ लागले. अस्ताई गातानाच संगीत रत्नाकरात सांगितलेले गाण्यातील दोष (कंपितम्, भीतम्, अव्यक्तम्) येऊ लागले. त्या बेक्रार अवस्थेतच तो गात होता. ढोलेकर त्यांनी त्याला धीर देत होते. शब्दाद्वाचून दिलेला धीर! त्याला काही उमजेना 'अनाहत वाजे ढोलु!' अशी ढोलेकरांची परमोच्च स्थिति झाली होती. गवय्याला घाम फुटला होता. घाम गाळता गाळता त्याने एकदाचे गाणे संपविले, म्हणण्य पेक्षा ते संपले. ढोलेकराना हायसे वाटले.

मला वाटते एकोणीसशे बेचाळीस साली गव्हर्नमेंट सेंट्रल बिल्डिंग्जमधे ऑल इंडिया रेडिओचे केंद्र आले. केंद्राचे सारे रूप पालटून गेले होते. शक्य त्या सुधारणा होत होत्या त्यावेळी इमारती इमारतींवर एरियलचे बांबू उभारलेले होतेच. ऑल इंडियाच्या गॅलरीवरून ते दृश्य बघत असताना कविवर्य मर्ढेकरांना ते बांबूचे वनच वाटले. "वन बांबूचे पिवळ्या गाते. आकाशातिल अधोरेखिते." या कवितेचा उगम ते दृश्य बघूनच झालेला आहे. त्या काळातही रेडिओमधील ध्वनिक्षेपणाच्या वेळी एखादा नवखा कलावंत माइकला बिचकतच होता. त्यावेळचा एक प्रसंग! एका गायिकेचे गाणे होते. योग असा की त्या ध्वनिक्षेपणाच्या वेळी मर्ढेकर स्वतः हजर होते. ती गायिका बिचकतच माइकसमोर गायला बसली. लाल दिवा लागताच अस्ताईला सुरुवात केली. बराच वेळ झाला तरी अस्ताई संपेना. अस्ताई स्थायी भावातच अंतऱ्याचा अंत झाला होता. ऐनवेळी तिला अंतरा सुचेना. अडखळू लागली. समोरच्या माईकलाच ती घाबरलेली होती. टाईमिंगच्या खुणा बघून तिची आणखीच तारांबळ उडाली होती. अखेरीस तिला अंतरा सुचला. कसेतरी गाणे संपले. मर्ढेकरांनी समाधानाचा सुस्कारा सोडला. त्या गायिकेने गाण्याचे हस्तलिखित जवळ ठेवले नसावे. आकाशवाणीमधे एखादेवेळी यांत्रिक बिघाड होईल. परंतु तांत्रिक बिघाड होणे शक्य नाही; परंतु त्यावेळी असे खरे!

हा कार्यक्रम संपल्यावर ऑफिस सुटले तरीपण मर्ढेकर बराच वेळ ऑफिसमधे बसले होते. आमच्या गप्पागोष्टी चाललेल्या होत्या. अधून मधून विनोदाचा फवाराही उडत होता. मर्ढेकर आणि विनोद! परंतु माझ्या सहवासात तरी असे घडून यायचे. झालेल्या कार्यक्रमाबद्दल बोलत असताना माईकला घाबरलेल्या त्या गायिकेची ओघानेच गोष्ट निघाली. त्यावर मी म्हणालो, "अरे माईका तऱ्हेवाईका, घाबरली गायिका" आणि पुढे गुणगुणतो तोच मर्ढेकर म्हणाले, "काहिं का तुला दया नाहि का?' अशी ही भूपतीवैभव.. या चालीवरची लहानशी कविता स्फुरली. ती माझ्या वहीत मी लिहून ठेवली होती. मर्ढेकरांच्या नेहमीच्या धाटणी व्यतिरिक्त त्यांच्या तोंडून प्रास-अनुप्रासही कसे निघून जात असत हे त्यांना सुचलेल्या ओळींवरून दिसून येईल; व आश्चर्यही वाटेल. कवितेतील अधोरेखांकित ओळी मर्ढेकरांच्या व बाकीच्या माझ्या आहेत. ती कविता अशी :—

अरे माइका तऱ्हेवाईका
घाबरली गायिका
काहिं का तुला दया नाहि का?
त्या लाल दिव्याने
लालिलाल जाहली
घटिकांना स्मरता
ताल चुकू लागली
अन् साजिंद्याची
चाल भकू लागली
अखेरीस मग सरले गाणे
सुटला मर्ढेकर
देउनी समाधानि ढेकर

खरे सांगायचे म्हणजे माइकसारखा प्रामाणिक कुणी नाही. श्रवण आणि श्राव्यता त्याच्यापासूनच शिकावी. माइक हा तऱ्हेवाईक नव्हे, तऱ्हेवाईक आहोत आपण माणसेच. माइक हा आस्थेवाईक आहे. तो स्वतः ऐकतो व ऐकलेले इतरांना ऐकवितो. त्याच्या श्रवणाला जिभा फुटलेल्या असतात. "की श्रवणीचि होती जिभा!" असा हा माइक!

**(पुढील क्षुद्रघंटिका : कवि मित्र्यां मंडळाची एक झलक)**

**यंदाच्या काही (धुकून) राहिलेल्या पंक्त्या!**




'विस्मृती'भूषण

अनुक्रमणिका






अनुक्रमणिका

....कादंबरीक्षेत्रात पहिले पाऊल टाकल्यापासूनच चोखंदळ रसिकांकडून वाहवा मिळविणाऱ्या

**प्रभाकर पेंढारकर**

यांच्या प्रणयप्रधान कादंबरीचा हा उत्तरार्ध—



# आज अचानक गाठ पडे



[५]

रोजची बांगडयांची किणकिण ऐकू आली नाही. केसातून हलकेच बोटे फिरली नाहीत किंवा गालावर दोन ओठ हुळहुळले नाहीत. त्यामुळं जाग आली तरी उठावसं वाटेना. संवयीप्रमाणं वाफा येणाऱ्या गरम चहाचा वास आला नाही, तेव्हा आठवलं की आज बायको नाही. स्वतःच उठून चहा करायला हवा.

उठलो, बायको नाही तेव्हा बरेच दिवसांनी आज रेकॉर्ड लावली, "आज अचानक गाठ पडे!"

त्या तंद्रीतच सर्व कामे उरकली. साडेआठला बाहेर पडायला मी तयार झालो. दार उघडले तर दारात सुरेखा! हातात एक ट्रे, त्यावर तीन चार बशा, सुरेखसा रुमाल त्यावर झाकलेला!

"मला वाटलं वेळेवर येते की नाही मी! हा तुमचा ब्रेक फास्ट!"

मी तसाच उभा राहिलो.

"घ्या ना!"

"असं दारात ब्रेक फास्ट देतात का? तुम्ही आत तर याल!"

"तुम्ही म्हणजे अगदी हे आहात"—म्हणत सुरेखा आत आली. टेबलावर तिनं बशा ठेवल्या. आत स्वयंपाकघरात जाऊन ती पाण्याचा ग्लास भरून घेऊन आली.

"जाऊ आता?"

"मला एकटयाला खायला नाही आवडत!"

'पण माझा ब्रेक फास्ट झालाय्!"

"ते काही चालायचं नाही. बसा!"

सुरेखा उभीच राहिली. मी म्हणालो, "आता बसता का हात धरून बसवू!"

ह्या धाडसी वाक्याचा परिणाम काय होईल ह्याबद्दल मनात धाकधूक होती. पण सुरेखा रागावली नाही. शेजारच्या खुर्चीवर बसली.

मी बशीवरचं झाकण दूर केलं. गरम ऑम्लेट, टोस्ट!

वा: पाहून तोंडाला पाणी सुटलं!

अर्धे ऑम्लेट दुसऱ्या बशीत घातलं आणि मी सुरेखापुढं बशी केली.

"मला खरंच नकोय!"

"आता मला तुम्हाला भरवायची पाळी येईल."



अनुक्रमणिका

खरं सांगायचं म्हणजे माझा माझ्याच कानावर विश्वास बसत नव्हता. प्रेमाची नशा चढली म्हणजे जिभेवरचा माणसाचा तावा जातो की काय? छेः भलताच धाडसी झालोय मी आज!

सुरेखानं खायलां सुरुवात केली. मीही! आम्ही दोघांनी खाणं संपवलं तसं सुरेखानं विचारलं,

झालं समाधान?"

"कुणाचं?"

"तुमचं. सगळं अगदी स्वतःच्या मनाप्रमाणं झालं पाहिजे!"

"स्वतःच्या मनाप्रमाणं झालं हे खरं, पण संगळंच नाही!"

"आता काय उरलंय्?"

आता काय सांगायचं हिला? तुम्हीच सांगा. तुम्ही काय म्हणाला असतात. बोला ना! तेच मलाही तिला सांगायचं होतं.

सुरेखानं वशा आवरल्या आणि ती निघाली. ती दाराजवळ पोहोचली तसा मी गडबडीनं तिच्यापर्यंत पोहोचलो आणि दार आडवत म्हणालो, "परत भेट?"

"पाहू!"

"नाही,—सांगा ना आत्ताच!"

"पाहीन, जमलं तर संध्याकाळी!"

"नक्की?"

"नक्की!"

"प्रॉमिस?" माझा हात पुढं झाला. हे त्यापुढचं धाडस!

मी साशंक मनानं स्वतःलाच पहात होतो.

"प्रॉमिस्!" सुरेखानं माझ्या हातावर हात ठेवला. माझ्या छातीचे ठोके एकदम दुप्पट वेगानं पडू लागले. सुरेखानं हात सोडवून घेतला आणि पहात पहात ती खारीसारखी भुरकन निघून गेली. वाटले, तिच्या माग़ोमाग जावे, तिला पकडावे, खारीसारखे हलकेच गोंजारावे. पण हातून तसे काही घडले नाही. मी आपला होतो तिथेच उभा राहिलो.

मोह टाळायला मनाची ताकद लागते; पण मला वाटतं त्यापेक्षा जास्त ताकद मोहाला सामोरी जाण्याड, कवटाळण्यात, त्याला स्वीकारण्यात लागत असावी! मोह टाळणारे फारच थोडे सैमर्थ संयमी असतील. बाकी सगळे आमच्यासारखे भित्यातच जमा होणारे असतात.

अगदी टॅक्सीनं जाऊनही पुरंदऱ्यांच्या मॅटरनिटी होममध्ये पोहोचायला मला दहा वाजून गेले; पण त्यावद्दल वायको एका शब्दानेही रागावली नाही—आणि ह्याचं कारण तिचा निरोप घेताना माझ्या लक्षात आलं.

"आईला तार केलीय्. ती येईपर्यंत मी राहू इथं?"

आता ही परवानगी मागणं वगैरे सगळं वरवरचं! मला खूष करायला!

"उद्या येईल आई. तोवर इथं कोणीतरी थांवायला हवं. पटतं ना!"

मग मी मनातली मळमळ बोलून टाकली.

"पहा बुवा,—तू अशी सारखी घरावाहेर राहिलीस तर माझी अन् बापटबाईंची मैत्री वाढेल!"

"वाढू दे, मला त्याची भीती वाटत नाही!"

"अशा मैत्रीतून आवड, आवडीतून स्नेह, स्नेहातून...!"

"पुरे, पुरे, प्रेमातबिमात तर पडायचा विचार नाही ना तुमचा!"

मी दचकलोच! हेही ब्रह्मदेवानं माझ्या कपाळावर सर्वांना वाचता येईल एवढ्या ठळक टाईपात लिहून ठेवलं आहे काय?"

"काही सांगता येत नाही."

"मला खात्री आहे माझ्या नवऱ्याची!"

"म्हणतात ना—नवरा म्हणू नये आपला!"

"ते नवऱ्यानं म्हणावं—स्वतःवद्दल! मी काही ती काळजी करत नाही!"

दुपारी संपादकांनी सांगितलं की इराणचे शहा आज जाणार आहेत. तेव्हा शास्त्री आणि तुम्ही दोघंही विमानतळावर जा फोटो घ्यायला!

विमान होतं सहाचं! पण एअरपोर्टला जाताना बायकोला फोन करून सांगितलं, संध्याकाळी यायला जमणार नाही. विमानतळावरच आठ वाजतील. खरं म्हणजे इतकं धडधडीत खोटं मी कसं सफाईदारपणे बोललो ह्याचं मलाच आश्चर्य वाटलं. कुणीतरी लिहिलं आहे ना, पती पत्नी एकमेकांना किती बेमालूम थापा मारू शकतात ह्यावरच संसाराचं यश अवलंबून असतं.

आम्ही विमानतळावर बरेच लवकर पोहोचलो. शास्त्री म्हणाला, 'चल कॉफी घेऊ!"

आम्ही दोघे कॉफीचे गरम घुटके घेत होतो, तो शास्त्री म्हणाला, "मग तू रस्त्यातच उतरणार आहेस?"

हो प्रथम शास्त्री कोण हे सांगायचं राहिलं! शास्त्री माझ्यासारखाच आमच्या पेपरचा प्रेस फोटोग्राफर! मूळचा बंगलोरचा! आता मुंबईचाच म्हणायचा! मराठी शुद्ध बोलतो. पुरणपोळीचं जेवण असलं की नेमका माझ्या घरी न बोलावता हजर असतो.

"तू घरी उतरणार असलास तर मला वहिनीला भेटायचंय!"

"ते कशाला?"

"सांगायचं आहे हल्ली तुझे काय उद्योग चालले आहेत!"

"काय चालले आहेत?"

"शिवायच्या सूया काय आणतोस, त्या कुकरचा व्हाल्व्ह, लोकरीचा गंडा. काय आहे काय? वहिनींच्या करता ह्या गोष्टी नक्कीच नाहीत!"

"कशावरून—?"

"मी ओळखतो ना तुला! आणि आणत असलास तर वहिनींना विचारून खात्री करून घेतो."

"बायको सध्या घरी नाही."

"मग कुठंय्!"

"पुरंदरे मॅटरनिटी होममध्ये!"

"कॉंग्रॅच्युलेशन्स्! आणि काय कॉफीवर भागवतो आहेस?"

"मग मेव्हणीला मुलगी झाली म्हणून तुला काय बीअर देऊ?"

"What an anticlimax!"








हळूहळू एअरपोर्टवर गर्दी जमू लागली. आता एक रुपया तिकीट ठेवलं आहे म्हणून बरं. एरवी काय भयानक गर्दीची जागा झाली होती ही ! संध्याकाळी फिरायला जायचं एक ठिकाण ! तासचे तास हे वघे सोफासेटवर बसलेले ! परदेशी प्रवाशांना बसायला जागा मिळणे मुष्कील ! आणि अस्वच्छता हा तर आपला राष्ट्रीय गुण आहे. वेफर्सच्या बॅगपासून आईस्क्रीमच्या रॅपरपर्यंत सर्व कागद कोठेही फेकावेत ! जाऊ दे – जग कितीही पुढं जावो, आपण आपली ही 'संस्कृती' टिकवून धरली पाहिजे !

नेहमीप्रमाणं निरोप समारंभ संपला. फुलांचे हार . . . हस्तांदोलने, हुकमी माफक हास्ये रेडीमेड भारावलेली अंतःकरणे, गुळगुळीत नाण्यासारखी वापरून वापरून झिजलेली वाक्ये – जेवढं मिळालं तेवढं आम्ही कॅमेऱ्यानं टिपलं !

घरी पोहोचलो तेव्हा सात वाजून गेले होते. घामेजलेला शर्ट काढतो आहे तितक्यात बेल वाजली आणि न थांबता वाजतच राहिली.

घाईघाईनं दरवाजा उघडला. दारात सुरेखा उभी. मी आपला पहातच राहिलो. डोक्यावर अद्यावत म्हणजे वीतभर उंचीची केशरचना ! गडद हिरवी बारीक डिझाइनची साडी, तसाच ब्लाऊझ, विदाह्यांचा ! गळ्यात मोत्याचा सर, कानात मोत्यांचे एअररिंग, मोत्यांच्या बांगड्या ! पावडरचा आणि सेंटचा गुदमरून टाकणारा उन्मादक वास !

"या ना आत !"

"किती वेळ केलात ? आम्ही निघालोय पार्टीला !"

"आत तर याल !"

"मिस्टर बापट घरी तयार होत आहेत !"

"आता आत येता का – ?"

ती आत आली, मी दार बंद केलं.

"आता सोडणार नाही तुम्हाला ?"

"म्हणजे ?"

"इथंच बंद करून टाकणार आहे !"

ती काहीशी भेदरली. अविश्वासाच्या नजरेने म्हणाली,

"काय म्हणताय तुम्ही ? "

"सांगतो– ! मी कॅमेरा उचलला फ्लॅशगन होतीच. पहाता पहाता मी तिचे दोन फोटो घेतले.

"इकडे पहा, आणि जरा, मान अशी ! . . छे अशी नाही !" म्हणत मी तिच्याजवळ गेलो. हनुवटीला हात लावून मान फिरवली. तो स्पर्श, त्यावरोबरचा गंध माझ्या डोक्यात चढला. मी शटर दावताच फ्लॅश लाईटनं क्षणमात्र खोली उजळली.



समाजवादाच्या नांवानी गरिबाला एक पै द्या मायबापऽऽऽ तुम्हांला सऽऽऽगळ्या लफड्यातनं सोडवीऽऽऽल...

"मी जाते !" भरकन सुरेखा खोलीं बाहेर पडली. मी म्हणालों, "रात्री वाट पहातो !"

इंतजारी नेहमीच मुश्कील असते ! अनुभव आहे ना तुम्हाला ! तरीही चर्चगेट स्टेशन घड्याळाखाली, फाऊंटन-ओ-रुटचा बस स्टॉप, इरॉस ॲडव्हान्स बुकींगच्या खिडकीसमोर ह्या जागा तरी बऱ्या! अशा जागी वाट पहाणं इतकं कष्टदायक नाही; पण इथं ह्या चार भिंतीत – घड्याळाचा काटा सरकता सरकत नाही.

दहा वाजून गेले. पार्टीला गेलेली सुरेखा एवढ्या लवकर परतेल ? आणि परतली तरी इथं येऊ शकेल ? वेडी आशा सुटत नव्हती. डोळे मिटू लागले होते तरी झोप येत नव्हती.

रेडियो सुरू केला आणि नेहमीप्रमाणं समोर खुर्ची ओढून त्यावर पाय पसरून आरामात, विविध जाहिरातीतून अधून मधून लागणारी हिंदी चित्रपटांची गाणी ऐकत पसरलो.

डोळ्यावरची झोप वाढत होती. पण एक गाणं इतकं सुरेख लागलं

"वह दिल कहांसे लावूं,
जो तेरी याद भूलाएँ;
. . . . माना यह तो मेरी खता है
लेकिन तेरी खाकमें मुझे रहने दे"

एकदम बेल वाजली. लगबगीनं उठून मी दार उघडलं. सुरेखा आत आली आणि ते गोरेगोरे उघडे हात तिनं माझ्या गळ्याभोवती टाकले. काय होतंय हे समजायच्या अगोदरच माझ्या छातीवर डोकं टेकून ती हुंदके देऊ लागली. मी दरवाजा बंद केला.

सुरेखा आता जास्तच रडू लागली. तिची केशरचना न विघडवता त्यावरून हालकेच हात फिरवणे म्हणजे महाकठीण काम होतं. पण ते मी सफाईनं केलं ! ते तिला समजलं की नाही कुणास ठाऊक, कारण त्यातले तिचे केस किती आणि खोटे किती हे समजायला मार्ग नव्हता.

तेव्हा तिला समजावे म्हणून तिच्या पाठीवरून हात फिरवला. पाठीवर ब्लाऊझ

नव्हता. नाही म्हणजे आपण चित्रपटात पहातो तसा वऱ्याचशा उघडया पाठीचा तो ब्लाऊझ होता. तिच्या नितळ, गोऱ्यापान पाठीवरून हात फिरवताना काय वाटलं हे सांगायला ही लेखणी असमर्थ आहे. तेव्हा काय वाटलं हे सांगायच्या भानगडीत न पडता मी तिची हनुवटी उचलली आणि तिच्या डोळ्यांचा हालकेच मुका घेतला. तो कमालीचा खारट लागला.

मी तिला धीर देत विचारलं, "सुरेखा, काय झालं?" काही वेळ ती हुंदके देत राहिली. मी परत विचारलं "ए काय झालं ग?"

सुरेखानं परत माझ्या शर्टात तोंड खुपसलं.

"सुरेखा, मी तुझा ना! मग मला नाही का सांगायचं?"

हे शब्द माझेच ना! कानावर विश्वास वसत नव्हता. पण बोलत होती माझीच जीभ!

"अविनाश –!"

"कोण अविनाश. कोण हा?"

"मिस्टर बापट –?"

"असं होय, काय झालं त्यांचं?"

"नेहमीचंच! खूप प्यायले पार्टीत!"

"काय माणूस आहे –?"

"मी गाडीत घालून कसंबसं आणलं त्यांना! आता घरी बिछान्यात पडलेत. मला घाण वाटते त्यांची. मला सोडायला तयार नव्हते. हा पहा पदर फाटला साडीचा!"

"काय बेशरम माणूस आहे? चक्क पदर ओढतो बायकोचा!"

मला खराखुरा सात्विक संताप आला. मी सुरेखाचे डोळे पुसले आणि तिच्या कपाळाचे छानसे चुंबन घेतले.

"आता रडू नकोस. मी आहे ना इथं!"

माझं वाक्य पुरं झालं नाही तो बेल वाजली. तो बेशरम बापट, तोच असणार. मी दारामागची धुणं वाळत घालायची काठी उचलली. सुरेखाला माझ्या पाठीशी घातलं आणि हिंमत करून मी दार उघडलं.

दारात माझी श्रीमती सकल सौभाग्यवती, वज्रचुडेमंडित सहधर्मचारिणी साक्षात् उभी होती!

काठी हातून सुटली आणि क्षणार्धात् मी घामानं स्नान केल्यासारखा ओलाचिंब झालो.

– दचकून मी जागा झालो. गाणी संपली तरी रेडिओ तसाच किरकिरत चालू होता. दिवा जळत होता. वर पंखा फिरत असताही मी घामानं डबडबलो होतो.

सुरेखा आलीच तर त्या खोलीतला दिवा दिसू नये म्हणून मी सगळे दिवे विझवून टाकले आणि बिछान्यात शिरून डोक्यावर चादर ओढून घेतली.

[ ६ ]

रोल नुकताच डेव्हलप झाला होता. ओल्याचिंब सुरेखाला –म्हणजे रोलमधल्या –हातात धरून मी निगेटिव्ह पहात होतो. फोटो सगळेच चांगले आले होते. विशेषतः ज्या फोटोकरिता मी तिची हनुवटी वळवली आणि मान तिरकी केली तो फोटो सर्वात चांगला आला होता. मोहक हास्य, हासताना किंचित बारीक झालेले डोळे, रेखीव भुवया आणि डोक्यावर वीतभर उंच

पक्षाचं घरटं ! सुरेखा मोठी विलोभनीय दिसत होती.

त्याच निगेटिव्हचा एन्लार्जमेंट खोलीत भितीवर टांगला आहे – आणि ह्या हकीगतीची सुरुवात त्या फोटोपासूनच झाली. वास्तविक हा एन्लार्जमेंट मी नाही काढलेला. आमच्या अर्धांगिनीने तो मुद्दाम शांग्रीलामधून काढवून आणला आणि फरेम करून नेमका माझ्यासमोर सतत राहील असा लावला. ही एक शिक्षा आहे मला !

पण हा सर्व पुढचा मजकूर मी तुम्हाला अगोदर सांगितला हं . . . कुठंपर्यंत आलो होतो आपण !

ह्या निगेटिव्ह पहात असताना सुरेखा आली. तिला पाहून मला कालचं स्वप्न आठवलं आणि उगीचंच हसू आलं ! ते पाहून सुरेखा म्हणाली,

"कां काय झालं ?"

"काल्च्या स्वप्नाची आठवण झाली. त्यात मी तुम्हाला पाहिलं !"

"काय करत होते मी – ?"

"माझ्या गळ्याला मिठी मारून उभ्या होतात आणि मी तुमच्या कपाळाची, खारट गालांची, डोळ्यांची चुंबने घेत होतो." – मी म्हणालो अर्थात मनातल्या मनात !

मला गप्प पाहून सुरेखा म्हणाली, "सांगता ना काय झालं स्वप्नात ?"

"सांगतो. पण स्वप्नात जे काही आपण पहातो ते काही आपल्या हातातलं नसतं !"

"नसतं कसं ? मनी वसतं ते स्वप्नी दिसतं !"



माझी वाचाच बसली. आता काय सांगतो ते स्वप्न !

"सांगा तरी!" परत आग्रह सुरू झाला.

"रात्री तुम्ही पार्टीहून परतलात – मिस्टर बापट खूप प्यायलेले होते. Excuse हं. स्वप्नातलं सांगतो आहे मी !"

"हं पुढं काय झालं ?"

"अगदी झोकांड्या जायच्या बाकी होत्या. तुम्हीच त्याना गाडीतून घरी आणलंत. कसाबसा जिना आधार देत चढवलात."

"एक मिनीट, तुम्हाला स्वप्न पहाटे पहाटे पडलं का ?"

"कां ?"

"नाही, विचारलं ! बरं पुढं सांगा !"

"मिस्टर बापटांना तुम्ही बिछान्यात झोपवलंत. त्यांनी तुमचा पदर घट्ट धरून ठेवला. तुम्ही रागानं तो ओढलात, आणि तो फाटला."

"मिस्टर बापट कधी कधी बरेच पितात, पण असे 'ऑफ' नाही होत."

"तुम्ही तशाच चिडून माझ्याकडे आलात !"

"पुढं – ?"

"पुढं काय ?"

"मी तुमच्याकडे आले, मग तुम्ही काय केलंत – ?"

"मी काही केलं नाही . . आलात ते तुम्ही माझ्या गळ्यात हात टाकलेत. म्हणजे असं की तुम्ही घाबरलेल्या होतात."

"पण तुम्ही असे गोंधळला का आहात. हे सारं फक्त स्वप्नातच ना ! प्रत्यक्षात तर नाही !"

"सुरेखा – !" मी एकदम बेभान होऊन म्हणालो : त्या आवेगात मी तिचा हात धरणार होतो तो सिनेमात आयत्या वेळी व्हिलनची एंट्री व्हावी तशी बेल वाजू लागली.

एकदम काल रात्रीचा प्रसंग आठवला आणि मला घाम फुटला. माझं स्वप्न खरं होणार तर – ! बायकोच आली असणार. माझ्या हृदयाचे ठोके नारखवांच्या तबल्या-सारखे वाजू लागले.

आमच्या ब्लॉकला दुसरा दरवाजा नाही. बाहेर पडायचा एकच मार्ग म्हणजे गॅलरीतून खाली उडी मारायला हवी.

बेल वाजतच राहिली. सुरेखा कुठं तरी आत अदृश्य झाली. सारा धीर एकवटून, मी दार उघडलं.

दारात – !

दारात माझ्या बायकोचे वडील, त्यांच्या पत्नी म्हणजे माझ्या सासूबाई, त्यांचा मुलगा, त्याची पत्नी आणि त्यांची तीन मुले !

दार उघडायची खोटी, सारा परिवार आत घुसला. दारात वाजी प्रभू देशपांडे व्हायचा माझा मानस कोठच्या कोठे धुळीस मिळाला.

माझ्या मेव्हण्याची ती तीन कार्टी, "आत्ती, आत्ती कुठं आहे म्हणून घर शोधू लागली.

सुरेखा त्यांना स्वयंपाकघरात पाठमोरी दिसली. त्याबरोबर, "आत्या, आत्या" म्हणत ती सुरेखाला बिलगली. आणि चूक लक्षात येताच बाजूस सरकली. तोवर सासूबाई जातीनं स्वयंपाकघरात पोहोचल्या होत्या.

मी लहानपणी पाठ केलेली रामरक्षा आठवण्याचा प्रयत्न करीत होतो. ती आठवेना तसं दुर्गास्तोत्र !

सुरेखानं गॅसवरून दूध उतरवलं आणि सासूबाईंच्याकडे पाहून एक मोहक स्मित करत ती म्हणाली –

"दूध तापवताना गॅस संपला. तसंच ठेवलं तर नासेल म्हणून तापवून घ्यायला आले होते मी ! जाते !"

आणि आमच्याच घरातलं दुधाचं भांडं पदरानं धरून सुरेखा झपझप निघून गेली.

बायकांच्या डोक्यापुढं कमाल आहे ! त्यांना डोकं कमी म्हणणारे सारे मूर्ख आहेत. पंतप्रधानच काय, राष्ट्रपती, उपराष्ट्रपती आणि परराष्ट्र खातं सगळीकडेच स्त्रियांच्या नेमणुकी व्हायला हव्यात ! मानतो आपण !









सासूबाईंनी आपल्या शांतवाग्रह एव्हाना नव्या जागेची पाहणी संपवली आणि हॉलमध्ये येऊन त्या म्हणाल्या –

"आता जरा ह्या ब्लॉकला साजेसं फर्निचर घ्या !"

"दिवाळसणाला येतो आपणाकडेच !" हे ओठावर आलेलं उत्तर मी तसंच गिळलं.

सासरेबुवा एका खुर्चीवर पसरत म्हणाले,

"त्या गिरगावातल्या दोन खोल्या सोडल्यात हे बरं केलंत ! काय ती जागा, सारखा घाम यायचा तियं ! इथं कसं प्रशस्त वाटतं !"

"ह्या एवढ्या मोठ्या घराला शोभा यायला रांगतं खेळतं मल हवं ! सहा वर्षं तशीच गेली !"

आणि आमच्या सासूबाईंनी असा एक मर्मभेदी दृष्टीक्षेप माझ्याकडे टाकला की त्यांच्या मुलीऐवजी मीच जबाबदार होतो ती सहा वर्षं गेली त्याला !

त्यानंतरचे सहा दिवस कसे गेले ते माझे मलाच माहीत ! आमच्या सासरच्या मंडळींचं हेच हेडक्वॉर्टर्स झालं होतं. त्यामुळे मुंबईतील त्यांची समस्त नातेवाईक मंडळी इथं जमायची. मुलाचं नाव काय ठेवायचं इथपासून बारसं कुठं करायचं इथपर्यंत सगळी चर्चा इथं चालायची ! मलं मोठं भांडं चहाचं म्हणून वापरायला काढलं होतं. ते सतत गॅसवरच असायचं ! असू दे... त्याबद्दल तक्रार नाही. पण ह्या सहा दिवसात प्रिय पत्नीचं दर्शनही अशक्य झालं होतं.

काहींच्या रजेचा प्रश्न होता, अनेकांना अनेक कामं, बाहेरचे उद्योग हे सर्व सोडून पुण्याच्या सर्वच मंडळींना मुंबईला बारशासाठी येता येणं कठीण होतं ! रजेचा प्रश्न नव्हता नव्या बेबीच्या बाबतीत ! तीच एक रिकामी होती ! तेव्हा तिलाच पुण्याला न्यायचं ठरलं, पुढचे तीन महिने तिचा व तिच्या आईचा मुक्काम पुण्यालाच रहाणार होता. मुलीचं पहिलं बाळंतपण आपल्याकडे करायचं चुकल्याचं सासूबाईंना दुःख होतंच ; तेव्हा बेत नक्की झाला आणि सासरेबुवांनी जनतेची एकदम बारा तिकीटं रिझर्व्ह करून टाकली. अगदी शेवटच्या दिवसापर्यंत, त्यातली दोन आमची आहेत ह्याचा मला पत्ता नव्हता.

रजा मिळणं खरोखरच अवघड होतं. शिवसेनेनं मोरारजी देसाईंच्या 'स्वागता'ची भली मोठी तयारी करून ठेवली होती ! मोरारजींच्या हट्टी स्वभावामुळे, त्यातून काही गोंधळ निर्माण होण्याची शक्यता संपादकांनी बोलून दाखवली आणि त्याचे फोटो घ्यायला आम्हाला तयारीत रहायला सांगितलं होतं.

ज्या दिवशीची तिकीटं सासरेबुवांनी काढली होती त्याच दिवशी – ७ फेब्रुवारीलाच – मोरारजींचं आगमन मुंबईत झालं.

शास्त्री प्रभादेवीला उभा होता. मोरारजींना शिवसेनेतर्फे निवेदन वरळीला दिलं जाणार होतं, तेथेच मी उभा होतो. कॅमेरा सज्ज करून ठेवलेला ; पण मोरारजींची गाडी आलीच नाही. ती दुसऱ्याच मार्गानं निघून गेल्याची बातमी आली. एवढ्यात कुणीतरी बातमी आणली की मोरारजींची मोटार थांबवण्याचा प्रयत्न करणाऱ्या शिवसैनिकाच्या अंगावर गाडी घालण्यात आली. शिवसैनिक जबरदस्त जखमी झाला आहे.

शास्त्रीला नेमका हाच फोटो मिळाला. नुकतीच डेव्हलप केलेली निगेटीव्ह त्यानं मला दाखवली. सुरेख आला होता फोटो ! म्हणजे आम्हां प्रेस फोटोग्राफरचं पहा ! एक माणूस मरतो आहे आणि मी म्हणतो आहे की फोटो छान आलाय् ! विचार केला की लाज वाटते स्वतःची !

इतक्यात प्यूननं येऊन सांगितलं, "फोन आलाय् !"

"कुणाचा आहे ?"

"तुमच्या घरचं कोणतरी बोलतंय् !"

"येऊ दे – मी डार्करूममध्ये आहे म्हणावं !"

खरं म्हणजे आज पुण्याला जायचं आहे हे मी एव्हाना पार विसरून गेलो होतो. मी आणि शास्त्री ती ओलीच निगेटीव्ह घेऊन संपादकांच्या खोलीत गेलो.

त्यांना फोटो पसंत पडला ; पण तसं चेहऱ्यावर दाखवायचं नसतं ना ! गंभीर चेहऱ्यानं त्यांनी आम्हाला तावडतोब एन्लार्जमेंट काढायला सांगितलं. आम्ही निघालो इतक्यात फोन वाजला.

संपादकांनी फोन माझ्या हातात दिला. सौभाग्यवतीच बोलत होत्या आणि तेही इतक्या खणखणीत आवाजात की खोलीतल्या प्रत्येकाला शब्दन् शब्द ऐकू यावा. दोन वाजून गेलेत आणि जनता तीन वाजता सुटते ही बातमी सौ. मला सांगत होत्या.

शक्य तितका आवाज सौम्य ठेवत मी म्हणालो,

"तू पुढं जा – ! मी रात्रीच्या गाडीनं येतो !"

आणि मग टेलिफोनमधून जो बॉबस्फोटाचा आवाज झाला. त्याने माझ्याच






काय, समोर बसलेल्या संपादकांच्या कानाच्या पडद्याला तडा गेला असावा.

घाईघाईनं त्यांनी विचारलं. "कोण बोलतंय्!"

"दुसरं कोण, आमच्या पत्नी!"

"तुम्ही हे प्रिंट काढून लगेच जा!"

"दुसऱ्या कुणाशी बोलताय्! माझं ऐकायलाही सवड नाही का तुम्हाला?" फोनमधून मशीनगनची एक फैरी झडली.

चारपर्यंत घरी येतो म्हणून सांगून मी फोन बंद केला.

घरी मी पोहोचलो तेव्हा साडे चार वाजून गेले होते. माझी कल्पना सर्वंच, सौभाग्यवतीही, पुण्यास गेले असावेत, आणि घराला नेहमीचं कुलूप ठोकलेलं असावं!

पण घराला कुलूप नव्हतं. काहीसं घाबरत मी बेल वाजवली. सौभाग्यवतींनी दरवाजा उघडला, हातातल्या घड्याळाकडे एक दृष्टीक्षेप टाकला आणि त्या आत निघून गेल्या. सासरेबुवा, सासूबाई, मेव्हणे आणि त्यांची कुटुंबसंस्था सर्वंच गेलेले दिसत होते वायकोचा राग काढणं आता कठीण नव्हतं. मी तत्परतेनं आतल्या खोलीत गेलो खोलीभर पसरलेल्या पसाऱ्यात ती आणि सुरेखा उभ्या!

त्यादिवशी घरातल दूधाच भांडं घेऊन गेल्यापासून सुरेखाची नि माझी नुसती दृष्टभेटही झालेली नव्हती. मनातून मी तिच्यावर रागावलो होतो; पण ते सांगायची ही वेळ नव्हती.



"तुम्ही जाऊन टॅक्सी आणणार आहात का हीही गाडी चुकवायची आहे?" सहा दिवसांनंतर भेटलेली वायको पहिलं प्रेमाचं वाक्य बोलली ते हे!

माझ्याकडे लक्ष न देता ती सुरेखाला सांगू लागली, "आमची घरकामाची बाई अद्याप यायची आहे. भांड्याचा ढीग पडलाय्. धुवायचे कपडेही तसेच पडलेत. चावी तुझ्याकडे ठेवून जाते!"

मी टॅक्सी आणायला बाहेर पडलो!

टॅक्सी घेऊन मी परतलो तर खाली वायको बॅग घेऊन उभी! खालच्या खाली आम्ही निघालो.

टॅक्सीत वायको, कोण्या अनोळखी माणसाबरोबर प्रवास केल्यासारखी दूर बसली होती. तिचा राग शांत करावा म्हणून मी तिच्याकडे सरकलो तर कपाळाला आठ्या घातलेला एक दृष्टीक्षेप... फिरून मुंबईच्या रस्त्यांची पहाणी!

"अग त्या शिवसैनिकानं मोरारजींच्या गाडीसमोर झोकून दिलं स्वत:ला!"

वायकोवर परिणाम नाही!

"हां साव, बोलते है वह हॉस्पिटलमें मर गया अभी!" टॅक्सीवाला सांगू लागला, "बहुत बुरा किया मोरारजीने। इतने सालसे हम बंबईमें टॅक्सी चलाते हैं, लेकिन किसीको टॅक्सीके नीचे मारा नाहीं अभीतक!"

ड्रायव्हरनं मोरारजीपेक्षा आपलं श्रेष्ठत्व सिद्ध केलं. तरीही वायको गप्पच!

हा अबोला तिनं प्लॅटफॉर्मवर सोडला आणि प्रश्न केला, "कॅमेरा घेतलात बरोबर?"

कॅमेरा – तो आणि कशाला?"

"आपण वारशाला चाललो आहोत. तिथं चार फोटो घेतलेत तर – !"

"हे बघ, मला नाही आवडत!"

"आवडत नसलं तरी घेता ना फोटो?"

"अग ती नौकरी आहे!"

"त्या सुरेखाचे फोटो घेतलेत ते वर्तमानपत्रात देण्यासाठी!"

मग आणखीन प्रश्न विचारण्याच्या फंदात न पडता मी टॅक्सी पकडली.

एका बहाद्दर सरदारजीनं चार मिनिटात मला घरासमोर आणून सोडलं. "गाडी बंद करू नकोस, आलोच!" म्हणून मी धावत सुटलो. एका ढांगेत चार चार पायऱ्या चढत मी जिना चढलो. दरवाजा उघडाच होता. मला पहाताच सुरेखा दचकली. वायकोनं तिच्याकडची आणलेली काचेची भांडी ती वेगळी करत होती.

मी कॅमेरा एअर बॅगमध्ये टाकला. फ्लॅशगन घेतली, आणि निघालो. दाराजवळ सुरेखा उभी होती. दार लोटलेलं होतं.

मी तिच्यासमोर उभा राहिलो. सुरेखा काही न बोलता माझ्या डोळ्यात पहात होती. क्षणमात्र खाली वाट पहाणाऱ्या सरदारजीचा मला विसर पडला. डोळ्यांला डोळे भिडले – आणि पुढच्याच क्षणी आम्हा दोघांचे ओठ एकत्र झाले.

क्षणभर सगळंच थांबलं. स्टेशनवरचं घड्याळही! माझ्या हृदयाचे ठोकेसुद्धा!

सुरेखा बाजूस झाली. मी बाहेर पडलो. धावतच टॅक्सीत घुसलो. टॅक्सी धावू लागली आणि एकदम लक्षात आलं तसा मी दचकलो.

टॅक्सीच्या त्या एवढ्याशा आरशात मी स्वत:चं तोंड पाहिलं. त्यावर कुठंही सुरेखाच्या लिपस्टीकचा रंग दिसत नव्हता.

तरीही मी पुन्हा पुन्हा रुमालानं ओठ पुसत राहिलो.

सरदारजींनी मला दादर स्टेशनबाहेर सोडलं तेव्हा पुणा मेल स्टेशनमध्ये नुकतीच शिरत होती. मी प्लॅटफॉर्मकडे धावत सुटलो.

* *

## [ ७ ]

वायको कुमूदच्या मुलीकरिता फिक्या गुलाबी रंगाचं स्वेटर करण्यात मग्न झाली होती. गाडीतील गर्दी, अधूनमधून बसणारे हादरे, फार काय सोबत असलेला नवरा ह्या सर्वांचा तिला विसर पडला होता. बोटं लोकरीचा धागा सुयांभोवती गुंफत होती आणि गाडीच्या आवाजाच्या ठेक्यावर बहुतेक ती, 'चार उलट, तीन सार्धे, पाच










अनुक्रमणिका

पऽत उलट," असं काही तरी मनाशी योजत असावी.

सेकंड क्लास असूनही मला बसायला जागा मिळाली नव्हती. कल्याणपर्यंत उभं राहून पाय दुखू लागले तेव्हा आमची बॅग मी वरच्या बर्थवरून काढली आणि प्रतिष्ठा गुंडाळून ठेवून बॅगेवर विराजमान झालो.

खंडाळ्याच्या घाटातून गाडी चढू लागली. नेहमीप्रमाणं मी दूरवर दिसणारी मावळची खोरी पाहू लागलो. मनात विचार चालले होते सुरेखाचे! घरी भरपूर पैसा आहे. बायकोकरिता मिस्टर बापटांनी उत्तमातला उत्तम रेडिओ, फ्रीज, मिक्सर सगळं काही आणून दिलं आहे. त्यांची जबाबदारी संपली. त्यांना वाटतं, सुख हे असं दुकानातून छानशा गुलाबी कागदात गुंडाळून दर महिन्याला रतीबासारखं घरी आणतां येतं. त्याकरिता बिचारे करताहेत काम. मिळवताहेत पैसा!

आणि सुरेखा! ह्या सगळ्या 'सुखाच्या' पसाऱ्यात तहानलेली आहे. एकटी आहे, अतृप्त आहे, आसूसलेली आहे. स्त्री अखेर प्रेमावर जगते. नवऱ्याच्या नाहीतर शेजाऱ्याच्या. तीही बिचारी अन् मिस्टर बापटही बिचारे!

आमच्या सासऱ्यांचा बंगला अगदी गजबजून गेला होता. मुंबई, पुणे, सोलापूर सर्वच ठिकाणची आप्तमंडळी माझ्याप्रमाणेच हातातली कामं सोडून बारशासाठी जमलेली! सासऱ्यांचा कर्वे रोडवर छोटासा बंगला आहे. कोल्हडला १८–२० एकरांची शेती आहे. तेव्हा धान्य घरचं, जागा स्वतःची! ह्या वयातही त्यांना अमाप उत्साह आहे. त्यांनी नातवाच्या बारशाला एखाद्या लग्नासारखा थाट उडवून दिला.

ह्यात समदुःखी होतो आम्ही तिघे! मी, नुकत्याच झालेल्या बेबीचे वडील–माझे साडू–आणि जिचं बारसं व्हायचं आहे ती बेबी! आम्हां दोघांकडे लक्ष द्यायला कुणालाच वेळ नव्हता. सकाळी मला दुसऱ्यांदा चहा लागतो. तो मी आणि साडू हळूच जाऊन 'अंबाभवन'मधून पिऊन आलो!

त्या लहान मुलीची स्थिती नेमकी आमच्या उलटी! जो तो येतो तो तिला उचलतो. तिचे मुके घेतो. ती ओळख नसल्यानं रडू लागली की "अरे वा मावशीला नाही का ओळखत?" "आँ; आत्याला नाही का ओळखत?" "अरे मी काकू तुझी!" ह्या गडबड गोंधळात जी काही थोडी झोप मिळत असेल तेवढीच सुटका तिची!

आम्ही पोहोचलो रात्री! माझी कल्पना दुसऱ्या दिवशी बारसं असेल. पण ते होतं तिसऱ्या दिवशी! बायकोचं म्हणणं आपण काय पाहुण्यासारखं आयत्या वेळी यायचं! मी कपाळाला हात लावला. तो दिवस तसाच गेला.

दुसऱ्या दिवशी बारशाची वर्दळ सुरू झाली. आमच्या सासऱ्यांना, साडूंना अभिनंदनाच्या तारा येत होत्या. त्यातल्या दहा पाच कुणीतरी माझ्या हातात आणून दिल्या. सहज चाळा म्हणून मी त्या उघडून वाचू लागलो आणि त्यातली एक तार माझ्याच नावाची निघाली. कुणी चुकीनं माझंच अभिनंदन केलं काय म्हणून पहातो तो तार आमच्या संपादक महाशयांची!

"मुंबई पेटली, कामावर हजर व्हा." अगदी वृत्तपत्राच्या हेडलाईनसारखा तारेतला मजकूर!

सकाळपासून पेपर शोधत होतो. 'मराठा' सापडला. मथळा होता – "मुंबई खलास!" मला समजेचना काय शिवसेनेनं विमानातून नापाम बॉम्ब टाकले मुंबईवर!

माझ्याशी बोलायला सवड असणारे ह्या गर्दीत एकच गृहस्थ, माझे साडू! मी त्यांना तार दाखवली. निर्विकार चेहऱ्यानं ते म्हणाले, "मला वाटतं, तुमच्या हातात असलेल्या तारा काल रात्री आल्या!"

मी साडूंना सांगितलं की मी निघतो. इतर कुणाला सांगितलं तर मला सोडणार नाहीत. मी गेलोय हे संध्याकाळी बारशाचे फोटो घ्यायच्या वेळेपर्यंत कुणाच्या लक्षातही येणार नाही.

कॅमेरा घेतला आणि घराबाहेर पडलो, डेक्कन जिमखान्याला आलो आणि तेथल्या पोस्टातून संपादकांना ट्रंककॉल केला. मी अद्याप निघायचा आहे हे समजताच गृहस्थ जाम उखडले. मी त्यांना विचारले की नेमके कुठले फोटो हवेत. त्यावर उसळून ते म्हणाले,

"मुंबईत पोहोचा. पहाल तिकडं फोटो घेण्यासारखीच परिस्थिती आहे."

आणि मग त्यांनी मला वर्तमानपत्रात न आलेली एक भयानक बातमी सांगितली. आमच्या फोटोग्राफर शास्त्रीला काल रात्री लोकांनी उपरा म्हणून बेदम मारल्यानं हॉस्पिटलमध्ये पोहोचतं करावं लागलं.

शिवाजीनगरहून मी एस्.टी.नं निघालो अकरा वाजून गेले होते. बसमध्ये हीच चर्चा चाललेली. कंडक्टरलाही बस बॉम्बे सेंट्रलपर्यंत पोहोचेल की नाही निश्चित सांगता येईना.

कसेबसे आम्ही ठाण्यापर्यंत पोहोचलो. येथून पुढे गाडी नेणं धोक्याचं अशी बातमी मिळाली. प्रत्येक गाडीवर दगडफेक होत होती म्हणे. सर्व प्रवाशांना ठाण्यालाच उतरवण्यात आलं.

ठाण्याला सर्वच व्यवहार थंडावलेले! रस्त्यावर बसेस नाहीत. टॅक्सी तर चुकूनही दिसेना. वेळ जात चालला तसा मी कमालीचा अस्वस्थ झालो. शेवटी सरळ पोलीस स्टेशनवर गेलो. तेथे एका इन्स्पेक्टरची ओळख निघाली आणि पोलिसांच्या गाडीतून आम्ही दादर स्टेशनला पोहोचलो.

नेहमी गजबजलेल्या त्या रस्त्यावर आज माणसं अजिबात नव्हती. पाहून मोठं बरं वाटलं. कधीतरी एखादा दिवस हे रस्ते, रेल्वेचे डबे, धावपट्ट्या, तिकीटे देणारी मशीन्स्, फुटपाथ, ह्यांना विश्रांती हवी की! दिवसातले चोवीस तास सतत चालणारी अजस्र गिरणी बंद असली की त्या मागांच्याकडे पाहून जसं वाटतं, तसं बरं वाटत होतं मला!

स्टेशनकडून मी मारुतीच्या देवळाकडे आलो आणि मला पहिला धक्का बसला. 'विसावा' हॉटेल आणि त्या शेजारची कापडाची दोन दुकानं बेपत्ता झालेली!

विसाव्यातल्या टेबल खुर्च्यांची राख तेवढीच उरली होती. इथं अनेकदा खाल्लेल्या कुरकुरीत डोशांची आठवण झाली. मन खिन्न झालं.

ह्या निर्मनुष्य रस्त्याचे, जळलेल्या विसाव्याचे, रिकाम्या कापडांच्या दुकानांचे फोटो घेत मी निघालो. रस्त्यात काचांचा खच पडला होता. बसस्टॉपची एकही शेड शिल्लक उरलेली नव्हती. दुधाची केंद्रं जाऊन फक्त राख उरलेली होती. मिळालेले फोटो चांगले होते ; पण हे सर्व घडून गेलेल्या गोष्टीचे ! एखादे दुकान आपल्यासमोर फोडले गेले, एखादी बस कोणी आपल्या नजरेसमोर पेटवून दिली तर— आणि मी स्वतःशीच दचकलो. काय अजब विचार मनात चाललेत. मी स्वतःशीच म्हणालो, "नको . . नको, नाही फोटो मिळाले तरी चालतील."

पण माझ्या वाटण्यावर ते थोडेच अवलंबून होते. हरिनिवासजवळ पोहोचलो आणि तेथले कापडाचे दुकान माझ्या नजरेसमोर फुटले.

रस्त्यावर झाडे आडवी टाकल्याने पोलिसांच्या गाड्या येण्याचा संभव नव्हता. लोकांनी पहाता पहाता कापडाचे तागे रस्त्यावर आणले, आणि जो तो मिळेल ते कापड आपल्या घरी पळवू लागला. काळी निमुळती पँट घातलेला आणि अंगात केवळ बनियन असलेला भरल्या अंगाचा बुटका तरुण ह्या सगळ्याचं 'नेतृत्व' करीत होता. दुकान फोडल्यावर प्रथम गल्ला ह्याच्या हस्तकांनी ताब्यात घेतला. आणि मग बघे लोक गिधाडं तुटून पडावीत तसे सगळेच कापडावर तुटून पडले. दुकान लुटणारे लोक सर्वच थरातले होते. रामा गड्यापासून ऑफिसात काम करणाऱ्या मध्यमवर्गीयांपर्यंत सर्वच खांद्याला खांदा लावून हे देशकार्य करत होते.

हे बरे वाईट वाटण्यापलिकडे मी आता गेलो होतो. मिळतील तसे फोटो मी घेत होतो. शिकारीप्रमाणं फोटोग्राफीची एक नशा असते. कॅमेरा आणि पुढं घडत असलेल्या प्रसंगाव्यतिरिक्त इतर कसलीच जाणीव मला उरलेली नव्हती.

आणि एकदम लक्षात आलं, त्यांचा म्होरक्या दिसत नव्हता. तो आपल्या टोळक्यासह सिटी लाईट सिनेमाकडे जाताना दिसला आणि मी त्याच्या मागे धावलो.

सिटी लाईट समोरचे कापडाचे दुकान अगोदरच फोडलेले होते.

बँक ऑफ इंडियाचा शोभिवंत दरवाजा कोणी विद्रुप करून टाकलेला होता. त्या टोळक्यापैकी कुणाच्या तरी डोक्यात कल्पना आली आणि दहापाच जणांनी, एका व्यायाम शाळेच्या प्लॅस्टिकच्या निळ्या सफेत बोर्डावर दगड फेकायला सुरुवात केली. ती निळी अक्षरे फुटून जाईपर्यंत ही दगडवृष्टी चालूच होती.

सिटी लाईट ओलांडून समोरच्या पेट्रोल पंपावर ही मंडळी आली आणि त्यांची तेथे काही चर्चा सुरू झाली. त्या दादाचा फोटो मला तेथे घेता आला. कॅमेऱ्यातली फिल्म संपली म्हणून मी एका आडोशाला उभा राहून ती फिल्म काढली. नवी भरू लागलो इतक्यात कुणाचं तरी लक्ष माझ्याकडे गेलं. घाईघाईनं दोघेजण माझ्याकडे आले.

"क्या करता है साला. हमारा फोटो खींचता है × × × !" त्यानी उमटपणे मला विचारलं. माझी बोबडीच वळली. घाबरून मी थरथर कापू लागलो. तोंडून शब्द फुटेना.

"बोलता नहीं साला—अभी बोलेगा !" आणि त्यानं माझ्या कानफडात अशी ठेवून दिली की माझ्या नजरेसमोर अनेक फ्लॅशगन बल्ब क्षणार्धात चमकले.

तेवढ्यात दादाने विचारले, "क्या करता है उधर ?" एकाने उत्तर दिले, "साला ये खींचता है अपना लोगोंका !"

तो दादा माझ्यासमोर येऊन उभा राहिला. पाचफूट फार तर पाच इंच उंचीचा तो माणूस मला एकदम पहाडासारखा वाटला. थरथर कापत मी हात जोडले.

"मारना नहीं . . हमको मारना नहीं !" मी पुटपुटलो.

"साला × × ×, वो कॅमेरा लाव !" दादानं माझ्या खांद्यावर लोंबकळणारा कॅमेरा काढून घेतला. हवेत गरगर फिरवला आणि समोरच्या भिंतीवर आपटला. एकदा, दोनदा, तीनदा ! नंतर कसं घडलं हे मला माहीत नाही, पण मी एकदम दादाच्या दोन



"गरीब जनतेच्या हितासाठी केलेल्या कामाचे पैसे कसले मागता ?"





खिबाडीत ठेवून दिल्या. त्या गालावर माझी पाचही बोटं सुरेख उठली. त्यातल्या दोघा चौघांनी माझे हात धरून पाठीशी पिरगळले नसते तर मला वाटतं मी त्या दादाचा गळा दाबला असता.

दादाला हा भयंकर अपमान वाटला. त्यानं मला शिव्यांची लाखोली वाहिली आणि डाव्या हातानं माझा शर्ट पकडून चांगल्या आठ दहा कानशिलात वाजवल्या. तेवढ्यानं त्याचं समाधान झालं नाही.

"साले को जला देंगे जिंदा!" तो म्हणाला. पेट्रोल पंप फोडून आतली टाकी उडवून द्यायची त्यांची योजना होती. चांगला जोराचा स्फोट झाला असता आणि घाबरून लोक भूकंपाच्या वेळेसारखे धावत सुटले असते. पण त्यांना पेट्रोल पंप काही फोडता येईना.

एवढ्यात कुणी तरी डबाभर पेट्रोल आणून माझ्या अंगावर ओतलं. त्यांच्या हेतुबद्दल आता मला शंका उरलेली नव्हती.

दादा म्हणाला, "जाव साला एक रस्सी ले आव. इसको वह पंपके साथ बांध के जला देंगे."

मला खेचून ते पंपाकडे नेऊ लागले. इतक्यात खुणेची कर्णकटू शीळ ऐकू आली. दादाच्या आसपासचे लोक धावत सुटले. पोलिसांच्या गोळीबाराचा आवाज ऐकू आला. दादा मला सोडायला तयार नव्हता. तो मला बांधलेल्या रस्सीने ओढत होता, इतक्यात एक गोळी आली आणि तो खाली कोसळला.

मी फर्शीवर पडलो आणि तसाच पडून राहिलो. आमच्या डोक्यावरून गोळ्या जातच राहिल्या. आता रस्त्यावर चिटपाखरू उरलेले नव्हते. माझ्यापासून काही अंतरावर दादा पडलेला होता. त्याच्या डोळ्यात खून उतरलेला होता. ओठ घाणेरड्या शिव्या पुटपुटत होते. कुणाचा तरी गळा दाबल्यासारख्या मुठी आवळत होत्या. काही मिनिटांनी त्याची धडपड थांबली. तो मेला की बेशुद्ध झाला हे कळायला मार्ग नव्हता. असाच गोळीबार चालला तर दादाच्या मागोमाग मीही 'हुतात्मा' होणार याची मला शंका राहिली नाही.

मी विचार करत होतो. उद्याकरिता पेपरला न्यूज झाली. नेहमीच आम्हाला दोष देणारे आणि आमच्याकडे केवळ न्यूज गोळा करणारी मशीन्स् म्हणून पहाणारे संपादक, त्यांना एकादा तरी माझ्याबद्दल चांगलं बोलावं वा लिहावं लागेलच! आपण यदाकदाचित ह्यात मेलो तरी तो अग्रलेख वाचायला मिळायला हवाच असं मला वाटू लागलं.

—पण मी काही मेलो नाही! पोलिसांच्या तावडीतून सुटून मी आमच्या बिल्डींगकडे परतलो तेव्हां दहा वाजून गेले होते. रस्त्यावर एकही दिवा शिल्लक नसल्याने काळोख पसरला होता.

सुरेखाच्या ब्लॉकची मी बेल वाजवली. आत अंधार होता. परत बेल वाजवली तसा दिवा लागला. दरवाज्याच्या भोकातून मला पाहिल्यानंतर हळूच दरवाजा अर्धा उघडला गेला. फोर्टमधल्या दुकानाच्या मॉडेलच्या अंगावर असते तशी नाईटी सुरेखानं घातली होती. झिरझिरीत कापडाची, तलम! अशी नाईटी कोणी महाराष्ट्रीय स्त्री वापरत असेल असं मला वाटलं नव्हतं; पण ते माझं अज्ञान! समाजातल्या एका वरच्या थरात माणूस पोहोचला की तो कोणत्या एका प्रांताचा रहात नाही. त्याची विचारसरणीच बदलते आणि मग हे ओघानं आलंच!

एरवी सुरेखाला मी असं पाहिलं असतं तर माझं हृदय छातीतून टूणकन् उडी मारून बाहेर हातावर आलं असतं. पण आता माझ्या डोक्यात तिसरेच विचार चालले होते.

"फोन करायचाय्!" मी म्हणालो.

सुरेखाची भीती एव्हाना कमी झाली होती. व्हरांड्यात बुटाशेजारी अंगाची वळकटी करून झोपलेल्या आठ दहा वर्षाच्या घरगड्याला ओलांडून आम्ही आतल्या खोलीत गेलो.

फोनवर संपादकच होते. मी त्यांना सांगितलं की त्यांना हवे तसे फोटो मिळाले आहेत.

"मग घेऊनच या लगेचं!"

"हे पहा, इथं काही वाहन मिळत नाही. आज माझा कॅमेरा गुंडानी फोडून टाकला. माझ्यावर पेट्रोल ओतून मला जिवंत जाळणार होते ते!"

"अस्सं, कुठं कुठं—? आणि मग तुम्ही काय केलंत—? —किती लोक होते ते..?"

माझ्या लक्षात आलं की संपादकांना माझ्या काळजीऐवजी सनसनाटी बातमीचंच औत्सुक्य अधिक आहे. उबग आला मला.

"जाऊ दे! तुमच्या दुर्दैवानं मी अद्याप जिवंत आहे. तुम्हाला फोटो हवे असले तर माझ्या घरी गाडी पाठवून ते नेण्याची पहाटेपर्यंत व्यवस्था करा."

मी फोन बंद केला.

सुरेखा माझ्या समोर उभी होती. माझे कपडे फाटले होते, केस विस्कटलेले आणि गालावर कदाचित सुकलेल्या रक्ताचा ओघळही असावा.

जवळ येत तिनं विचारलं, "खरंच तुम्हाला गुंड जाळायला निघाले होते?"

"होय!" मी तो विषय तितकाच थांबवत म्हणालो.

"मिस्टर बापट कुठं आहेत?"

"अहमदाबादला गेलेत. आज यायचे होते; पण प्लेन कॅन्सल झालं!"

"मी चलतो, काम आहे!" मी निघालो. सुरेखानं हाऊस कोट घातला आणि ती मला दारापर्यंत पोहोचवायला आली.

मी घरात आलो. घामानं भिजलेला शर्ट काढून टाकला. डार्करूममध्ये जाऊन कामाला सुरुवात करणार इतक्यात दारावर टकटक आवाज ऐकू आला. पहातो तो सुरेखा.

"मी आत येऊ? मला फार भीती वाटू लागलीय एकटीला रहायची!"

सुरेखा माझ्या बाजूस उभी राहिली. डार्करूममध्ये पंखा नव्हता. मी दिवा बंद




केला. क्षणमात्र काहीच दिसेनासे झाले. संवयीनं मी रोल कॅसेटच्या बाहेर काढला आणि डेव्हलपरमध्ये बुडवला.

गरम होत होतं. अंगातून घामाच्या धारा लागल्या होत्या. सुरेखा हलकेच माझ्या बाजूस सरकली. तिने लावलेल्या कोल्ड क्रीमचा वास मला येऊ लागला. पण मी रोलवरून लक्ष ढळू दिलं नाही. जीव धोक्यात घालून मी कमावलेली एवढीच गोष्ट होती!

रोलचं डेव्हलपिंग पूर्ण झालं. मी दिवा लावला. सगळेच फोटो चांगले आलेले पाहून मला हायसं वाटलं. सुरेखा रोल पाहू लागली, जळलेलं विसावा हॉटेल, निर्मनुष्य रस्ते, हरिनिवासजवळच्या दुकानाची लुटालूट – आणि शेवटी पेट्रोल पंपाजवळ उभा असलेला तो दादा. प्रत्येक फ्रेम बोलकी होती. शेवटची फ्रेम पहाताच तिनं मिला विचारलं,

"हाच का तो माणूस?"

"हो!"

"आणि हाच तो पेट्रोल पंप?"

"हो तोच, जिथं मला जिवंत जाळणार होते."

सुरेखा कमालीची घाबरली. जणु फोटोतला तो दादा सजीव होऊन आमच्या समोर उभा होता. आणि ती मला एकदम घट्ट बिलगली.

पुढं काय झालं – ?

थांबा आठवण करतो!

सुरेखाला मी मिठीत घेतलं आणि तिच्या ओठावर ओठ टेकले. पण हे एकदम कसं माझ्या हातून घडलं हे अद्याप मलाही न सुटलेलं कोडं आहे. बायकोच्या इतक्या दिवसांच्या तुटकपणाचा तो सूड असावा, कदाचित त्या दादावरचा राग असावा, स्वतःच्या असहाय्यपणाच्या चिडीला ते उत्तर असावं, मनात दडपून ठेवलेली ती सुरेखाबद्दलची आसक्ती असावी, अथवा स्त्री आणि पुरुष एकत्र आल्यावर उसळणाऱ्या भावनांचा तो नैसर्गिक उद्रेक असेल. निश्चित मला सांगता येणार नाही. पण मी सुरेखाची चुंबने घेत सुटलो. ओठांची, गालांची, डोळ्यांची... ती भेट किवावंद होईपर्यंत आणि बंद झाल्यावरही – !

केव्हातरी मला जाग आली!

डोकं जड झालं होतं. अंग दुखत होतं. गाल बहुतेक सुजले असावेत. किती वाजले समजेना! पण उन्हं चांगली वर आली होती.

उठून बसलो तर क्षणभर चक्कर आल्यासारखं वाटलं.

काल रात्रीचा प्रसंग आठवला. खोलीत सुरेखा नव्हती. फार काय तिच्या रात्रीच्या येथील वास्तव्याची पुसटशीही खूण कोठे दिसत नव्हती.

बेल वाजली आणि मग लक्षात आलं की की ह्या बेलच्या आवाजानंच मला जाग आली. थांबून थांबून ती मघापासून वाजतच आहे. उठलो, दार उघडलं!

दारात माझी परमप्रिय सहधर्मचारिणी पत्नी उभी होती. तिच्या मागं आमचे सासरेबुवा!

व्हरांड्यातून दोघेही आत आले. हुश्श करत सासरेबुवा बाहेरच्या खुर्चीवर बसले. आणि फॅन सुरू करायच्या ऐवजी हातातल्या वर्तमानपत्राने वारा घेऊ लागले. बायकोच्या मागोमाग मी आतल्या खोलीत आलो आणि थकून कॉटवर बसलो. बायको माझ्या शेजारी येऊन उभी राहिली. हलकेच तिनं माझ्या केसावरून हात फिरविला. हनुवटीला हात लावून तिनं माझा चेहरा वर उचलला आणि माझ्या सुजलेल्या गालावरून तिची थरथरती बोटं फिरली. हालकेच तिचे ओठ माझ्या कपाळावर टेकले गेले.

बाहेरच्या खोलीत सासरेबुवा बसले आहेत हे विसरून मी लहान मुलासारखे तिच्या कुशीत तोंड लपवले –

तुम्ही मला व्यवहारशून्य म्हणा, भाबडा, भोळा भीरू किंवा मूर्ख! पण त्यानंतर आठच दिवसात आम्ही ती जागा सोडली आणि फिरून आम्ही गिरगावातल्या जुन्या जागेत रहायला आलो.

माझा कॅमेरा गेला, नवीन घेण्यासाठी दीड दोन हजारांचा खर्च येणार आता नव्या ब्लॉकचे हप्ते भरणे परवडणार नाही हे कारण खोटं नसलं तरी ते काही पूर्ण सत्य नव्हे! नव्या जागेकरिता काढलेल्या कर्जाच्या परतफेडीसाठी पत्नीनं नोकरी करायची असं ठरलं होतं; पण आता तीही शक्यता राहिली नाही. डॉ. पुरंदऱ्यांनी तिला आता दगदग नको म्हणून सल्ला दिला आहे.

सुरेखाची त्यानंतर एक दोनदा भेट झाली होती. तिच्या नजरेत ओळखीचे चिन्हही नव्हते. कुणाला सांगितलं नाही, पण तुम्हाला सांगतो की ती परकी नजर हेही एक कारण!

आता हे सर्व तुम्हाला सविस्तर का सांगितलं ते सांगतो!

वय वाढलं की चांगल्या मुलीबद्दलही चौकस लोक इतर काही खोडी सापडली नाही तर, "ह्या पूर्वी लग्न कां झालं नाही?" – हा प्रश्न विचारतात.

अशी चांगली जागा ह्यांनी सुखासुखी कां सोडली हा प्रश्न मला ऐकावा लागला.

आठशे स्क्वेअर फीट एरिया, सेल्फ कंटेंड ब्लॉक–रेडीपझेशन, पश्चिमेकडचा समुद्राचा वारा–बारा मिनिटांच्या अंतरावर स्टेशन, तीन मिनिटांच्या अंतरावर बस स्टॉप, उत्तम वस्ती आणि प्रेमळ शेजार! तुम्ही जागेच्या शोधात आहात का? बँकेचं व्याज वाढतं आहे. मला पैसे परत करायचे आहेत.

फक्त अठरा हजार रुपये आता द्यायचे! राहिलेले हप्त्यांनी! तावडतोब भेटा, गिरगावातल्या घरी अथवा वर्तमानपत्राच्या कचेरीत!

घर घेणाऱ्यास एक बोनस भेट!

बैठकीच्या खोलीतल्या कपाटात मी मुद्दामच एक रेकॉर्ड विसरलो आहे.

"आज अचानक गांठ पडे."

• • •

(ह्या कथेतील सर्व व्यक्ती व प्रसंग संपूर्ण काल्पनिक आहेत. जागेकरिता लेखक वा संपादक ह्यांच्याशी पत्रव्यवहार करू नये.)

# जो सत्ता हातीं धरी, त्याच्या घरी ऋद्धी-सिद्धी पाणी भरी

**अशी जगात सर्वत्र परिस्थिती आहे....
म्हणूनच 'सत्ता' कोणाच्या हाती आहे,
त्यावरच देशाचे भवितव्य अवलंबून आहे...**

**दादूमीया**

यांच्या गाजलेल्या लेखाचा हा
उत्तरार्ध ...



# सत्ता

कटबाजी व गटबाजी सर्व देशांतून आढळते. अमेरिकेत त्यास "लॉबीइंग्" म्हणून ओळखले जाते. रशियात पक्षाच्या उच्च समिती-मधील दहा बारा लोक साऱ्या देशावर राज्य करतात. लोकशाही वा साम्यवादी झोटींगशाही यांच्यातील हा सारखेपणा मनोरंजक आहे. लोकशाहीतदेखिल मुख्य पक्षातील दहाबारा जणांचा गट (वा सिंडीकेट) देशावर खरे राज्य करतो. मात्र रशियात सत्तेच्या जोरावर या गटाने विरोध करणाऱ्या एका संपूर्ण मध्यम वर्गाचे चक्क शिरकाण केले! ह्या गटाच्यावर क्रुश्चेव्हने शिरजोरी करताच क्रुश्चेव्हलाच उडविले गेले! आपल्याकडे लाल बहाद्दूर शास्त्रींनी कामराजांचे महत्व असेच कमी केले होते. लाल बहाद्दूर शास्त्री जास्त काळ जिवंत राहते तर सिंडीकेटने लालबहाद्दूर शास्त्रींना 'फायर' करण्यास मागे पुढे पाहीले नसते असे मोरारजी देसायांनी मला सांगितले होते.

पूर्वीची राजेशाही आज दिसत नाही. भावी काळात ती दिसण्याची संधीही नाही. लोकशाही व राजेशाही यात एक मोठा फरक आढळतो. लोकशाहीची सारी प्रक्रिया उफराटी आहे व म्हणून ती प्रक्रिया वेगवान् नाही. वाल्या कोळ्याने "मरा मरा" म्हणून जसे 'राम राम" झाले व पुढे वाल्याचा वाल्मिकी झाला त्याप्रमाणे लोकशाहीतील सत्तेचा वापर व गैरवापर करणारा राजकीय पुढारी अप्रत्यक्षरीत्या लोकशिक्षण व लोकजागृती साधून लोकशाहीचे अंतिम हितच साधीत असतो. लोकशाहीत जुने पुढारी "लोक बेईमान झाले!" अशी तक्रार करताना आढळतात. त्यांची ही तक्रार रास्त असते का? लोक बेईमान होत नाहीत. ते शहाणे होऊन विचारतात, "बाबा रे, तू आमच्यासाठी काय केलेस?" राजकीय पुढाऱ्यास सत्तेची चटक लागते. सत्तेवर राहण्यासाठी मराठ्याला पकड, लिंगायतांना हाती धर, अस्पृश्यांना खूष कर, मुसलमानांना डोक्यावर चढवून ठेव, प्रांतीय भावना चेतवून त्या त्या लोकांना चेतव असला प्रकार आढळतो. मात्र या विशिष्ट गटास ह्या पुढाऱ्यास राजी करावेच लागते. त्यांची सेवा करावीच लागते. मेननने मुंबईत उल्हासनगरशेजारी एक नवीन पश्चिम रेल्वे लोकलचे स्टेशन करवून घेतले. कऱ्हाडला विमानतळ झाला. सुरतेस मेडीकल कॉलेज निघाले. अशी उदाहरणे असंख्य आहेत. लोकहित हा 'कॉमन फॅक्टर' आहे. याची दुसरी बाजू शिवसेनेस शरण होणे, ज्ञानोपासनेस उत्तेजन न देता होयबांना पर्मीट व लायसेन्स देणे ही होय. आज मंत्रिमंडळांची संख्या एवढी फुगलेली वाटते त्यामागे अशीच राजकीय असमर्थता आढळते. या अशक्ततेचा फायदा गुंड लोक बरोबर उठवितात. सज्जन बिचारे मागे पडतात!

## कालचक्र? छः सत्तेचे चक्र

आपण ज्यास कालचक्र म्हणतो ते खरे म्हणजे सत्तेचे चक्र असते. सत्ता – मग ती सरळ मार्गाने मिळविलेली असो किंवा वाम-मार्गाने असो – सूर्याप्रमाणे उदय पावते तशीच अस्तासदेखिल जाते. सत्तेवर असताना तोंडदेखली स्तुती करणारे आजुबाजूस गोळा होतात. अशा वेळी खरे बोलणारी व दोष दाखविणारी व्यक्ती शत्रू-प्रमाणे वाटू लागते. अशी व्यक्ती मानी असेल तर दोनचार अपमान सहन करून पुन्हा ती फिरकेल अशी अपेक्षा कशी करावी? किंबहुना सत्ताधीशाभोवती गोंडा घालणाऱ्या स्तुतिपाठकांची योजनाच अशी असते की अशा निर्भीड व्यक्तींचे आपोआप 'शिरकाण'च व्हावे. 'नवी विटी नवे राज्य' सत्ताधिकाऱ्यांच्या बाबतीत अगदी खरे आहे. – आणि या शिरकाणीतच सत्ताधीशाच्या नाशाचे बीज पेरलेले असते. काळ सूड घेतो तो या विनाशाच्या वेळी! संभाजीची औरंग-





अनुक्रमणिका

जेबाने क्रूर हत्या केली तेव्हा संभाजीस सारे शिरकाण नक्कीच आठवले असेल. पण् अशा वेळी इतका उशीर झालेला असतो की काहीच उपाय चालू शकत नाही.

मोरारजींचे शिरकाण इंदिराबाईंनी केले त्यावेळी मोरारजी-भाईंनी दोन मुद्दे पुढे मांडले: (१) मोरारजीभाईंचे कोणीही ऐकूनसुद्धा घेतले नाही. (२) पुढारी का पक्ष, असा प्रश्न जेव्हा उभा राहतो तेव्हा पक्षहित श्रेष्ठ असावे. इंदिराबाईंनी मला पसंत पडतील ते पक्षाचे लोक मी घेईन, असे कृती करून दाखवून दिले. गुजरातेत यावर विशेष प्रतिक्रिया झालीच नाही. गुजरात काँग्रेसने एक कागदी विरोधाचा ठराव पसार केला! बस्स्, यापलीकडे विशेष असे काहीच घडले नाही. जो तो म्हणे, "मोरारजीभाईंनी जीवराज मेहतांच्या वेळी असेच धोरण आखले होते व त्यांना डच्चू दिला होता. आज ती वेळ मोरारजीभाईंवर आली आहे!" ती गोष्ट खोटी नाही. जीवराज मेहतांनी मंत्रिमंडळात रसिकलाल परीख व रतुभाई अदाणी या दोन मंत्र्यांचा समावेश केला होता. त्यास मोरारजी-भाईंचा विरोध होता. जीवराज म्हणत, "मी माझी टीम पसंत करणार?" मोरारजीभाई म्हणत, "मी सर्वांचा पुढारी, मी म्हणेन तसेच झाले पाहिजे." जीवराज मेहता ऐकेनात. मोरारजीभाईंनी इतर काँग्रेस पुढाऱ्यांच्या संमतीने जीवराजांविरुद्ध अविश्वासाचा ठराव आणला व जीवराज मेहतांना राजकारणातून हाकलून दिले! नेहरूंना ही कथा समजली व त्यांनी जीवराजांची इंग्लंडमध्ये राजदूत म्हणून नेमणूक केली!

सदोबा पाटलांनी मुंबईत आपले साम्राज्य स्थापले होते. ते मुंबईचे अनभिषिक्त राजे होते. पण या सदोबांचेच पतन त्यांच्याच मुंबईत फर्नांडीससारख्या मामुली पुढाऱ्याकडून व्हावे हा केवढा दैवदुर्विलास? डॉ. आंबेडकरांचे उदाहरण याच पद्धतीचे देता येईल. ज्या अस्पृश्यांनी या भीमास 'देव' केले त्याच अस्पृश्यांच्या मदतीने काँग्रेसने त्यांच्या दुसऱ्या जातभाईस निवडून आणले व या भीमाचे पतन घडविले. कामराजांचा शब्द तामीळनाडमध्ये प्रमाण होता एकेकाळी, त्याच मद्रासमध्ये एका कॉलेजच्या विद्यार्थ्याने त्यांना पराभूत करून त्यांचे नाक कापावे ना? हे सत्तेचे कालचक्र असेच फिरत राहते. त्यातून आयूब-सुकर्ण-नेहरूंसारखेदेखिल सुटत नाहीत, सामान्य पुढाऱ्यांची त्यापुढे कथा काय? या चक्रातून क्वचितच संजीव रेड्डी किंवा लाल बहादूर शास्त्रींसारखा पुढारी सुटतो व नशिबवान् ठरतो! त्याच्यात असामान्य गुण असतात म्हणून नाही, तर इतर सत्ताधीशांना हा compromise candidate निरुपद्रवी व म्हणून आपल्या भावी फायद्याचा वाटतो म्हणून!

## पुढारी व निष्ठावान अनुयायी

सत्ताधीशाचा उदय व अस्त यांचा नीट अभ्यास करावयाचा असल्यास सत्ताधिकारी व त्यांचे भक्त यांच्या संबंधांचा अभ्यास उपयोगी पडेल. या संबंधांच्या चार पायऱ्या आपणास आढळतात– (१) पहिल्या काळात भक्तास हा पुढारी अगदी आदर्श वाटतो, त्याचे शब्द तो फुलासारखे झेलतो व त्याची आज्ञा शिरसावंद्य मानतो. हा पुढाऱ्याचा उदयकाल असतो. (२) दुसऱ्या काळात भक्तास अतिपरीचयात् अवज्ञा होऊन पुढाऱ्याचे दोष हळूहळू कळू लागतात. तरी देखिल तो गप्प बसतो व आदरापायी पुढाऱ्याचे सर्व दोष पदरात घालतो. या कालात पुढारी सर्वोच्च झालेला नसतो पण त्याची महत्त्वाकांक्षा त्यास त्या अधिकाराच्या स्थानाकडे पाय टाकावयास लावते. (३) तिसऱ्या काळात भक्त लोक प्रश्नार्थक मुद्रा करून आपली नाराजी व्यक्त करीत असतात पण या काळात पुढारी सर्वशक्तीमान् असल्यामुळे त्यांचे विशेष काही चालत नाही. (४) चौथ्या काळात पुढाऱ्याचा अस्तकाल अटळ असतो. भक्त उघडपणे सत्ताधीशाच्या पापांची चौकशी करतात व क्वचित् त्याचा अपमानदेखिल करण्याचे धाष्टर्य दाखवितात. बिचारा सत्ताधीश! त्याच्या अहंकारी कर्तबगारीवर दोष ठेवायच्या ऐवजी तो आपल्या नशिबालाच दूषणे देत असतो!! याच वेळी कोणी दुसरा बेरक्या महत्त्वाकांक्षी सत्ताभिलाषी पुढारी जनतेच्या डोळ्यात धूळ फेकून आपला उदय साधण्याच्या खटपटीत असतो!

सत्तेचे व्यसन दारूच्या व्यसनाप्रमाणे वाढत जाते. ते सुटत नाही. माझ्या ओळखीचे एक काँग्रेसचे पुढारी आहेत. त्यांच्या गावात ते मेयर आहेत. त्यांच्या प्रदेश काँग्रेसचे अध्यक्ष आहेत. त्यांच्या स्थानिक विद्यापीठाचे सर्वोच्च व पडद्यामागून सर्व सूत्रे हालविणारे महत्त्वाकांक्षी पदाधिकारी आहेत. ते गांधीजींसारखे साधे व सरदार पटेलांसारखे कडवे आहेत.

हाती सत्ता आल्यावर त्यांची पहिली पाच वर्षे त्यांचे राजकारण मोठे सरळ व सालस होते. जनतेचे त्यांनी खूप भले केले व गोर-गरीबांचा दुवा घेतला. बऱ्याच गरजूंना नोकऱ्या लावल्या, अनेक गरीब विद्यार्थ्यांना मुक्तहस्ताने मदत केली. अनेक गरीब मातांची फुकट बाळन्तपणे केली व त्यांची कुटुंबनियोजनाची ऑपरेशन्स् माफक भावात करून दिली. सर्वत्र निरनिराळ्या शस्त्रक्रियांचे कॅम्प्स घडवून आणले. गावात दूध चांगले मिळत नसे. त्यासाठी पाश्चराईज्ड् दूध देणारी भव्य डेअरीची योजना उभारली. मध्यम स्थितीतल्या लोकांसाठी स्वस्त घरे बांधून दिली. पुढे हे जनहित साधीत असताना त्यांना सत्तेची व पैशाची चटक लागली. व्यसन व चटक दोन्ही सारखीच. त्यांना मर्यादा रहात नाही. त्यातून हे मेयरसाहेब पडले अतिमहत्त्वा-कांक्षी. सत्ता, पैसा व महत्त्वाकांक्षा यापैकी एकेक दुर्गुण माणसास बिघडविण्यासाठी समर्थ आहे. ते तिन्ही एकत्र झाल्यावर काय विचारावे?

## एका सत्ताधीशाचे उदाहरण

ह्या काँग्रेसी पुढाऱ्याने सारी सत्ता आपल्या आप्तांच्या हाती केंद्रित करून इतरांना सळो की पळो करून सोडले. सत्तेमुळे ते साऱ्या क्षेत्रात नाक खुपसू लागले. शिक्षणक्षेत्रात त्यांच्या वशिल्याची थर्ड क्लास तट्टे मेडीकल व इंजनीयरींग कॉलेजात प्रवेश मिळवू लागली. त्यामुळे खऱ्या गुणांची मुले मागे पडू लागली. मेयरसाहेबांच्या मुला-मुलींना व आप्तांना विद्यापीठातील जागा व पदके आपोआप मिळू लागली. खऱ्या हुषार प्राध्यापकांना सतावण्यात येऊ लागले हेतू






ह्या की त्यांनी कंटाळून राजीनामा द्यावा ! पुष्कळदा त्यांच्या बदल्या करविण्यात आल्या. नगरपालिकेची लाखालाखाची इमारतींची कामे निघू लागली व त्यातून प्रत्येक कोपऱ्यावर नाक्या नाक्यावर मेयरसाहेबांचे अद्ययावत् सुखसाधनांनी सुसज्ज असे नवे घर वर येऊ लागले ! त्यांना हांजी हांजी करणाऱ्या अधिकाऱ्यांना प्रमोशन व स्वाभिमानी अधिकाऱ्यांची बडतर्फी असा काळ आला. प्रत्येक उद्योगधंद्यात यांना किंवा यांच्या नातेवाईकांना डायरेक्टर बोर्डामध्ये ठेवल्यासच औद्योगिक सवलती मिळत असत. नाहीतर त्यांचे पाणीच तोड, वीजच बंद कर, प्लॉट ग्रीन् बेल्टमध्ये टाक, वगैरे प्रकार सुरू होत. साऱ्या गुंडांना अभयस्थान यांनी दिल्यामळे गरीबगरीब जनतेस गुंडांचा ताप वाढत चालला.

हे उदाहरण ओळखीच्या व डोळ्यासमोर घडत असलेल्या सत्ताभिलाषी पुढाऱ्याचे दिले. असे मेयरसाहेब किंवा सत्ताधिकारी प्रत्येक मुख्य शहरात सध्याच्या भ्रष्ट राजकीय पक्षांच्या पुण्याईमुळे डझनांनी सापडतील ! इन्कम् टॅक्स न भरणारे, वीजेचे बिल फुकट वीज मिळते म्हणून शेकड्यांनी चढविणारे, शहरातील राजधानीतच राहून प्रवासाचा भत्ता गडप करणारे, वैद्यकीय खोटी बिले तयार करून ते पैसे सरकारकडून वसूल करणारे कित्येक मंत्री, राजकीय पुढारी, अधिकारी व समाजसेवक मला माहीत आहेत. नावे कुणाची घ्यायची व कुणाची वगळायची ? सर्वच प्रांत सारखे व सर्वच जाती ! मोठ्यापासून छोट्यापर्यंत सत्तेचे हे भ्रष्टीकरण नंगा नाच घालताना दिसून येते. सर्वोच्च पुढाऱ्याचे हात जर या सत्तेच्या भ्रष्ट खेळात अडकले गेले तर तो त्याच्या हाताखाली असणाऱ्या लोकांना कोणत्या तोंडाने उपदेश करणार ?

अशा जुलमी, अन्यायी व अंध हुकूमशहांच्या विरुद्ध चळवळ करणारे व त्यांची पापे उजेडात आणून त्याविरुद्ध लोकमत तयार करून त्यांना सत्तेवरून खाली खेचण्याचे प्रयत्न करणारे महाभाग खरोखरीच धन्य होत. हे काम सर्वात अवघड व साहसाचे आहे. कारण अशा सत्तांध हुकूमशहांच्या पापांचे समर्थन करणारे, हांजी हांजी करणारे व विकत घेतले जाणारे विद्वान सहज व केव्हाही उपलब्ध असतात. कर्णाने शेवटपर्यंत दुर्योधनास साथ दिलीच ना ? मेननची इंग्लंडमधील दुष्कृत्ये जगजाहीर होती तरी नेहरूंनी त्यास बढती देऊन युनोत पाठविले व देशाचा संरक्षण मंत्री बनविले.



बहुधा अशा सत्ताधिकाऱ्यांनी ज्यांचा अपमान केला आहे, ज्यांची मने दुखविली आहेत असेच पुढारी ईर्षेने, सूडाने पुढे येऊन अशा जुलमी सत्तांधांना आवाहन देतात. सूडाची भावना त्यांची मने पेटविते व तसले काम करवून घेते. कारण सत्तांध अधिकाऱ्यांच्या, राजाच्या व हुकूमशहाच्या कारकीर्दीत स्वस्थ बसणेच जास्त सुरक्षित व म्हणून शहाणपणाचे असते. एक पाहण्यासारखी गोष्ट आहे की सत्तांध पुढाऱ्याची शंभर पापे पुरी होऊन पापाचा घडा भरला व त्यास वाईट दिवस आले की मगच त्याच्या हाताखालचे लोक एकामागोमाग एक पुढे येऊन ह्या असा वाईट होता, त्याने हे निर्णय चुकीचे घेतले, त्याने अमक्यास कुत्र्याप्रमाणे वागविले अशी भूतकाळाची भाषा वापरतात.

उदाहरणार्थ, मेननची संरक्षणविषयक कारकीर्द उजेडात आणणारी व हिमालयाच्या चीनने केलेल्या स्वारीची व आपल्या पराभवाची मीमांसा करणारे आज ४–५ ग्रंथ उपलब्ध आहेत. हे ग्रंथ सारे सेनानींनीच लिहिले आहेत. ते वाचून प्रश्न उभा राहतो : "ह्या मेननच्या चुका या महाभागांना ठाऊक होत्या तर ह्यांच्यापैकी कोणी एकही त्यावेळेस कां तोंड उघडू शकला नाही ?" जनरल थिमय्यांचा तेवढा अपवाद आहे. ह्या सद्गृहस्थाने हिमालयाच्या धोरणावरून मेननशी आपले जमत नाही म्हणून सरळ राजीनामा सादर केला ! तीच गोष्ट नेहरूंवर आज सतत टीका करणाऱ्या पुढाऱ्यांची. सुरवातीस फक्त सावरकर, डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी किंवा डॉ. लोहिया यांचीच हिंमत नेहरूंविरुद्ध आरोप करण्यात चाले. बाकी सर्व मूग गिळून बसत. आज साऱ्यांचा तोफखाना चालतो.

## भीष्म-द्रोण आंधळे झाले

सत्तेपुढे शहाणपण नसते हेच खरे. द्रौपदीची वस्त्रे भरसभेत फेडली जात असता सारी वृद्ध कौरव मंडळी व भीष्म-द्रोणांसारखे अनुभवी अधिकारीदेखिल धृतराष्ट्राप्रमाणेच आंधळ्याची भूमिका बजावीत होते ! आजच्या वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध ज्ञाते मंडळीत विशेष फरक पडला आहे असे वाटत नाही. केंद्रीय मंत्री किंवा राजपाल असताना हरिभाऊ पाटसकरांनी चुकून एका अक्षराने सरकारविरुद्ध निषेध नोंदविला नाही. मात्र पुणे विद्यापीठाचे उपकुलगुरु होताच महाजन अहवालाविषयी ते २२ ऑक्टोबर १९६७ रोजी म्हणाले, "सरकारने किंवा पक्षाने आपल्या हातून सत्ता जाईल म्हणून न्यायाचा मार्ग सोडता कामा नये. न्याय मिळविणे हेच सर्वात महत्त्वाचे आहे." २३ ऑक्टोबर १९६७ रोजी ते म्हणाले, "परकीय देशाने आपल्यावर अणुअस्त्र सोडू नये यासाठी संरक्षणास आवश्यक म्हणून भारताने अण्वस्त्रे पैदा केलीच पाहिजेत."

उशीरा सुचलेल्या या शहाणपणाने चिडून एका पुणेरी टीकाकाराने पाटसकरसाहेबांना सुनावले, "फक्त हिंदूंना एकपत्नीत्वाचा कायदा लावणे हे द्विधर्मी राज्यात न्यायाचे होते का ? महाराष्ट्रापासून मुंबई वेगळी काढणे न्यायाचे होते का ? जवानांनी रक्त सांडून जिंकलेले हाजी पीर सोडणे न्यायाचे होते का ? पुनश्च आक्रमण





# ३० लाख स्त्रिया चुकणें शक्य नाहीं

गेल्या चार वर्षांत ३० लाखांपेक्षां जास्त स्त्रियांनी लूप बसवून घेतले. त्यांना ठाऊक आहे कीं, लूप :—

परिणामकारक आहे—तो संतती-नियमनाचें एक अत्यंत प्रभावी साधन आहे.

साधा आहे—तो लावायला डॉक्टरांना कांहीं मिनिटेंच लागतात.

काढतां येण्याजोगा आहे—जेव्हां तुम्हांला मूल हवे असेल, तेव्हां तुम्हीं लूप काढून टाकू शकतां.

सोयीचा आहे—लूप लावला म्हणजे इतर कोणतीही पद्धत उपयोगांत आणण्याची जरुरी नाहीं. लूपमुळें वैवाहिक सुखांतही व्यत्यय येत नाहीं.

निरुपद्रवी आहे—कारण त्यामुळें कोणत्याही प्रकारचा रोग होत नाहीं. जर कांहीं परिणाम दिसले तरी ते सहज दूर करतां येतात.

डॉक्टर काळजीपूर्वक पाहणी केल्यानंतर सांगतात कीं, बहुतेक सर्व स्त्रियांसाठी लूपच सोयीस्कर आहे. ज्या थोड्या स्त्रियांना हो सोयीचा नाहीं त्यांना आपल्या दोन मुलांत अंतर ठेवतां यावे आणि संतति मर्यादित राखतां यावी म्हणून इतरही साधनें वापरतां येतात. तुमच्या नजीकच्या कुटुंब-नियोजन केंद्राचा सल्ला घ्या. कुटुंब-नियोजनविषयक सल्ला व सोयी विनामूल्य उपलब्ध आहेत.













करणार नाही असे आश्वासन नसताना ताश्कंद करार करणे न्यायाचे होते का? स्वजनांना न्याय देणे त्यांनाच शक्य असते जे परकीयांकडून न्याय मिळवून दाखवितात. आपण सतत करीत आहोत तो सत्तेची खुर्ची टिकविण्याचा व्यवहार!"

पाटसकर काय, राधाकृष्णन् काय, राजगोपालाचारी काय किंवा कृपलानी काय सारे या बाबतीत एकाच माळेचे मणी आहेत. "तेव्हा गेला होता कुठे तुझा धर्म?" असे ठणकावून या लोकांना कोणी विचारले तर ते गप्प बसतात. मात्र क्रुश्चेव्हने अशा प्रश्नास अत्यंत खोचक व समर्पक उत्तर दिले होते. क्रुश्चेव्ह अमेरिकेच्या दौऱ्यावर असतांना त्यास पत्रकारांनी वेढले. एका धीट पत्रकाराने त्यास विचारले, "पंतप्रधानसाहेब, आज आपण स्टालीनच्या विरुद्ध एवढे बोलत आहात. पण तो जिवंत असताना आपण काय करीत होता?"

क्रुश्चेव्हने एकदम आपली चर्या क्रुद्ध केली, मुठी आवळल्या, दातओठ चावले व तो ओरडला, "कोणी हा प्रश्न विचारला?"

एकदम सर्वत्र शांतता निर्माण झाली. कोणी हूं का चूं करेना. आता काय होणार अशी भीती सर्वांनाच वाटू लागली.

एवढ्यात क्रुश्चेव्ह मोठ्याने हासला व म्हणाला, "मित्रांनो, तुम्ही आता जे करीत होतात तेच मी त्यावेळेस करीत होतो. मी चूप बसून होतो!"

## सर्वांनीच धर्म सोडला

भारतात पूर्वी चातुर्वर्ण्य होता. ब्राह्मण ब्राह्मणाचे काम करी, क्षत्रिय क्षत्रियाचे, वैश्य वैश्याचे व शुद्र शूद्राचे. पुढे जातींच्या उपजाती झाल्या व ब्राह्मणांनी ब्राह्मणत्वाचा व्यापार सुरू केला. क्षत्रियांनी राष्ट्रीयत्व सोडले व ते शत्रूंशी संधान बांधून आपला धर्म व आपला देश बुडविण्यासाठी त्यांचे चाकर होऊन राहीले. वैश्य व शूद्र? त्यांनी व्यापार व चाकरी चालू ठेवली – पथ्य न पाळता. धर्माचे पालन करताना शत्रूशी व्यापार व शत्रूची चाकरी करायची नसते! अशा बदलत्या परिस्थितीत सत्तेने आपले स्थान सोडले व ती परक्याची बटीक बनली. ब्राह्मणही मूर्खच! बदलत्या परिस्थितीत नवा, सतेज व ज्वलंत राष्ट्रीयत्व हाच धर्म हे शिकवायचे सोडले. कोणच्याही परिस्थितीत सरतेशेवटी धर्माचाच विजय होतो अशी खुळी व भ्रामक समजूत भारतात अजूनही प्रचलीत आहे. भगवंत अवतार घेईल व शत्रूचा निःपात करील अशी हिंदूंची भावना. भारतात गेल्या पाच हजार वर्षांत त्या भगवान कृष्णाने अजून एकदाही "संभवामि युगे युगे" हे आपले वचन पाळलेले नाही. पाळले असते तर भारताची आजची दयनीय अवस्था झाली नसती.

मुसलमान राजास विष्णूचा अंश समजण्यापर्यंत भोळ्या-भाबड्या हिंदूंची मजल गेली होती. राणी व्हिक्टोरीया ही कलीयुगात शंभर वर्षे राज्य करणार असे म्हणे प्राचीन काळी लिहून ठेवले होते! नंतर म्हणे रामाने आशीर्वाद दिलेल्या तृतीयपंथी लोकांचे राज्य येणार! लहान मुलांसाठी या भाकडकथा ठीक आहेत. ह्यावरदेखिल विश्वास ठेवणारे मूर्ख लोक या देशात आहेत म्हणून मलीक अंबर गफूरासारखा शुद्र सेनानी विजयनगरच्या सामर्थ्यशाली साम्राज्याचा निःपात करू शकला! साऱ्या मोगलांनी तत्त्वज्ञान, धर्म व नीतीतत्त्वे यांचे गड्डे असलेली सारी धर्मकेंद्रे व मंदीरे धुळीस मिळविली. गोव्यात व केरळात ख्रिस्ती पाद्र्यांनी या धर्म पंडीतांचे व त्यांच्या दुबळ्या भक्तांचे पद्धतशीर हालहाल करून त्यांना जबर-दस्तीने ख्रिस्ती बनविले. आजही या सधन व सशस्त्र धार्मिक सेनानी-पुढे हिंदु धर्मीयांची गरीब गाय बनली आहे.

यावनी सत्तेपुढे शरणागती पत्करावी अशी हीनावस्था "सत्यं शिवं सुंदरम्" मानणाऱ्या आर्य धर्मावर कां बरे यावी? याचे कारण सत्ताधीशास धर्माचा पाहिजे तो अर्थ लावणारे धर्माचे दलाल भाड्याने वा विकत मिळू शकतात म्हणून धर्म वा नीती यांचे अर्थ आजुबाजूची परिस्थिती बदलली की लगेच बदलतो. असहिष्णु परकी-यांवर "क्षमा शीलस्य भूषणम्" असे म्हणून दया दाखविणारे क्षत्रिय पुण्यवान् का शिवाजीसारखे मुसलमानांचा पराभव करून आपले गोब्राह्मणप्रतिपालक हिंदूराष्ट्र स्थापन करणारे वीर पुण्यवान्? का या दोघांनाही बाटवून त्यांनी ऐकले नाही तर त्यांना जिवंत जाळून टाकणारे रोमन कॅथॉलिक पुण्यवान्? या धर्मप्रसाराच्या मोहीमेत धर्म कोणचा व अधर्म कोणचा हे प्रत्यक्ष शंकराचार्यांनादेखिल सांगता येणार नाही! कारण एक बाजू मांडली तर शिवाजी थोर ठरतो व दुसऱ्या बाजूने तो पापी ठरतो. जयचंद किंवा इतर वेडे व आदरा-तिथ्यात अद्वितीय असे स्वाभिमानशून्य राजपूत त्या दृष्टीने पुण्यवान ठरतील!

धर्म व नीती यांचे अस्तित्वच अशा रीतीने बिनबुडाचे ठरविल्या-वर अनियंत्रित सत्तेचे भवितव्य धोकादायक नाही काय? ह्या अनियं-त्रित सत्तेची गाडी विनाशाकडे जाणार नाही काय?

## धर्म-नीती बंधने कशासाठी?

जुन्या काळी हा धोका टाळण्यासाठी तर समाजाने स्वतः होऊन आपल्यावर धर्माची व नीतीची बंधने लादून घेतली. जेव्हां जेव्हां समाजाची घडी विस्कळीत होऊ लागली, सत्तेचा अमर्याद दुरुपयोग होऊ लागला व सामाजिक स्थैर्य धोक्यात येऊ लागले त्यावेळी समाजा-तील द्रष्टे पुढे आले व समाजास काही व्यावहारिक सत्यांचा – प्रेम, बंधुभाव, ज्ञान, न्याय वगैरे – उपदेश करू लागले. अमर्याद सत्तेच्या गैरवापराने दुःखी झालेले जीव या साधुसंतांचा आश्रय घेऊन आपला स्वार्थ साधण्यासाठी या साधुसंतांचा व परमार्थाचा प्रचार करतात, त्यांना संरक्षण देतात, त्यांना शक्य तेवढी मदत करतात. अशा रीतीने दोन सत्तेच्या अभिलाषी पुढाऱ्यांमधील विध्वंसक दुहीनामक शक्तीतून Constructive अशी नवीन प्रेरणा जन्म घेते. त्याचे नाव क्रांती.

सत्तेची धुंदी वा मद अटळ आहे त्याप्रमाणे क्रांती हीही अटळ आहे. क्रांती घडली नाही तर समाज डबक्यातील पाण्यासारखा सडून जाईल. अन्यायास मर्यादा राहणार नाही. आवाहन देणारा व स्वीकार-णारा क्रांतिकारक म्हणूनच समाजाच्या दृष्टीने चक्क कायदेशीर कृत्य करीत असतो – सत्ताधिकारी त्यास कायदेशीर मानोत अगर न मानोत.

काय गंमत आहे, सत्तेवर नसणारे पण सत्तेची अभिलाषा बाळगणारे राजकारणीच या सत्ताधिकाऱ्यांचा निषेध करून घोषणा ठोकतात:

"इन्किलाब झिंदाबाद!
क्रांतीचा विजय असो!!"

• • •





# फिल्म इन्स्टिटयूट ऑफ इंडिया, पुणे

## प्रवेश मिळवू इच्छिणाऱ्यांकरिता सूचना

संस्थेच्या ता. १ जुलै १९७० या शैक्षणिक वर्षापासून नियमितपणे सुरू होणाऱ्या पहिल्या वर्षाच्या खालील शिक्षणक्रमासाठी अधिकृत छापील फार्मावर उमेदवाराकडून अर्ज मागविण्यात येत आहेत.

१) **दिग्दर्शन** (Direction)–तीन वर्षे; **कमीत कमी शैक्षणिक पात्रता** : आर्टस् किंवा सायन्सची पदवी किंवा तत्सम पदवी प्राप्त. वय : १९ ते ३० वर्षे १–७–१९७० ला पूर्ण.

२) **चित्रपट कथा लेखन** ( Screenplay Writing) – तीन वर्षे; **कमीत कमी शैक्षणिक पात्रता** आर्टस् किंवा सायन्सची पदवी किंवा तत्सम पदवी प्राप्त. **वय** १९ ते ३० वर्षे १–७–१९७० ला पूर्ण.

३) **चलत्चित्र छायालेखन** ( Motion Picture Photography) तीन वर्षे, **कमीत कमी शैक्षणिक पात्रता**– पदार्थ विज्ञान शास्त्र व रसायन शास्त्र, किंवा तत्सम विषय घेऊन इंटरमिजिएट (ज्या उमेदवारांनी हायर सेकंडरी परीक्षा उत्तीर्ण केली आहे अशानाही तीन वर्षाच्या शास्त्राच्या पदवी परीक्षेचे पहिले वर्ष उत्तीर्ण होताच प्रवेश देण्यात येईल, मात्र त्यांनी पदार्थ विज्ञान शास्त्र व रसायन शास्त्र हे विषय त्या परीक्षेसाठी घेतलेले असावेत) किंवा फाइन आर्टस् (पेंटिंग) ची विश्वविद्यालयाची किंवा अधिकृत मान्यता असलेल्या संस्थेची पदवी किंवा डिप्लोमा. मॅट्रिकनंतर डिप्लोमाचा अभ्यासक्रम दोन वर्षांचा पूर्ण केलेला असावा. **वय** १७ ते ३० वर्षे १–७–१९७० ला पूर्ण.

४) **ध्वनिमुद्रण आणि ध्वनी स्थापत्यशास्त्र** (Sound Recording And Sound Engineering)-तीन वर्षे; **कमीत कमी शैक्षणिक पात्रता** : पदार्थ विज्ञान शास्त्र, रसायन शास्त्र, व गणित किंवा तत्सम विषय घेऊन इंटर मिजिएट उत्तीर्ण (ज्या उमेदवारांनी हायर सेकंडरी परीक्षा उत्तीर्ण केली आहे अशानाही तीन वर्षाच्या शास्त्राच्या पदवी परीक्षेचे पहिले वर्ष उत्तीर्ण होताच प्रवेश देण्यात येईल मात्र त्यांना पदार्थ विज्ञान, विज्ञान शास्त्र, रसायन व गणित हे विषय या परीक्षेसाठी घेतलेले असावेत.) **वय** : १७ ते ३० वर्षे १–७–१९७० रोजी पूर्ण.

५) **चित्र संकलन** (Film Editing) –दोन वर्षे. **कमीत कमी शैक्षणिक पात्रता** इंटरमिजिएट आर्टस् किंवा सायन्स किंवा तत्सम परीक्षा उत्तीर्ण. ज्या उमेदवारांनी हायर सेकंडरी परीक्षा उत्तीर्ण केली आहे अशानाही तीन वर्षाच्या पदवी परीक्षेचे पहिले वर्ष उत्तीर्ण होताच प्रवेश देण्यात येईल.) **वयः** १७ ते ३० वर्षे १–७–१९७० ला पूर्ण.

६) **चित्रपट अभिनय** ( Film Acting )– दोन वर्षे **कमीत कमी शैक्षणिक पात्रता** : मॅट्रिक्युलेशन किंवा तत्सम परीक्षा इंग्रजी हा एक विषय घेऊन उत्तीर्ण. हिंदीचे कामचलाऊ ज्ञान आवश्यक. विशेष लायकीच्या स्त्री उमेदवारास ही अट शिथील केली जाईल. **वय** : १६ ते २५ वर्षे मुलींकरिता आणि १८ ते २५ वर्षे मुलांकरिता १–७–१९७० ला पूर्ण.

**प्रवेश परीक्षा**–पुरुष उमेदवार / स्त्री उमेदवार विश्वविद्यालयीन बोर्डाच्या परीक्षेस एप्रिल / मे / जून १९७० ला परीक्षेस बसला / बसली असेल आणि त्याचा / तिचा निकाल संस्थेच्या त्या वेळच्या प्रवेश परीक्षेपर्यंत मिळू शकला नाही तर त्याने / तिने संस्थेच्या त्यावेळी होणाऱ्या प्रवेश परीक्षेपर्यंत तो / ती ज्या संस्थेत शिक्षण घेत असेल त्या संस्थेच्या प्राचार्यांचे / प्रमुखाध्यापकांचे त्याचा निकाल लागे तोपर्यंतच्या मुदतीचे प्रशस्तीपत्र सोबत असले पाहिजे. प्रवेश परीक्षेत निवडलेल्या उमेदवारास तात्पुरता प्रवेश दिला जाईल. पण त्याला नियमानुसार आपण आवश्यक ती परीक्षा उत्तीर्ण झालो आहोत असे ३१ जुलै १९७० पर्यंत लेखी पुरावे सादर केले पाहिजेत. हे न झाल्यास त्याचा / तिचा तात्पुरता प्रवेश रद्द केला जाईल. आणि त्याने / तिने भरलेली फी परत केली जाणार नाही.

विविध शिक्षणक्रमाच्या अभ्यासासाठी प्रवेश परीक्षेच्या आधारावरच प्रवेश दिला जातो. दिग्दर्शन, चित्रपट कथालेखन, चलच्चित्र छायालेखन, ध्वनीमुद्रण, ध्वनी स्थापत्यशास्त्र व चित्रसंकलन या परीक्षांकरिता लेखी व तोंडी परीक्षा द्यावी लागेल. लेखी परीक्षा मुंबई, दिल्ली, कलकत्ता व मद्रास येथें १० मे १९७० (रविवार) या दिवशी घेतली जाईल. या लेखी परीक्षेत लायक गुण मिळविणाऱ्या सर्व उमेदवारांस तोंडी परीक्षेसही बसावे लागेल व ती परीक्षा संस्थेत **२२ जून** १९७० या काळात होईल. चित्रपट अभिनयाकरिता ठेवलेल्या प्रवेश परीक्षेत आवाजाची चाचणी व पडद्यावरच्या हालचाली याबाबत विशेष लक्ष पुरविले जाईल. या चाचणी परीक्षा मुंबई, दिल्ली, कलकत्ता व मद्रास येथे मे १९७० च्या सुरुवातीस होतील. निश्चित तारखा उमेदवारांना योग्य वेळी कळविल्या जातील.

**शिष्यवृत्त्या** – विविध विषयांच्या बाबतीत विशेष आवड आणि उत्साह दाखविणाऱ्या आणि समाधानकारक प्रगती करणाऱ्या उमेदवारांना खास सवलती दिल्या जातील. केंद्र सरकार, आंध्रप्रदेश सरकार, आसाम, बिहार, गुजरात, केरळ, महाराष्ट्र, म्हैसूर, मध्य प्रदेश, ओरिसा, पंजाब, पश्चिम बंगाल व मद्रास राज्ये आणि संगीत नाटक संगम यातर्फे लायक विद्यार्थ्यांसाठी पारितोषिके व शिष्यवृत्त्या ठेवलेल्या आहेत.

**हॉस्टेल**–मुलांमुलींकरीता संस्थेमार्फत वेगवेगळी हॉस्टेले चालविली जातात.

**अर्ज कसा कराल** – संस्थेच्या माहिती पत्रकासोबतच अर्जाचा नमुना शिक्षणक्रमाची अधिक माहिती, प्रवेश परीक्षा, शिष्यवृत्त्या इ. इ. सर्व ती माहिती पुरविली जाते. हे सारे साहित्य **प्राचार्य, फिल्म इन्स्टिटयूट ऑफ इंडिया, पुणे** ४ या पत्त्यावर १ रुपयाची क्रॉस पोस्टल ऑर्डर पाठवून मागविता येईल. क्रॉस पोस्टल ऑर्डर 'प्राचार्य, फिल्म इन्स्टिटयूट ऑफ इंडिया, पुणे' यांच्या नावानेच असावी. आपल्या विनंती पत्रासोबतच २५ × १८ सें. मी. लांबी रुंदीचा स्वतःचा पत्ता लिहिलेला व ३० पैशांचे तिकीट लावलेला लखोटाही असावा. पोस्टल ऑर्डर व स्वतःचा पत्ता लिहिलेले तिकीट लावलेलं पाकीट असल्याशिवाय कोणत्याच प्रकारचा पत्रव्यवहार केला जाणार नाही. १ रुपया मनीऑर्डर किंवा चेकने पाठविल्यास तो स्वीकारला जाणार नाही.

**उमेदवारानें आपला संपूर्ण प्रवेश अर्ज माहिती-पत्रकात दिलेल्या प्रमाणें ५ रुपयांच्या पोस्टल ऑर्डरसमवेत १ एप्रिल १९७० पर्यंत संस्थेच्या कचेरीत पाठवावेत.**

davp. 571 (42) 16











'लग्न केलंच तर प्रेम-लग्नच करीन' अशी भीष्म-प्रतिज्ञा केल्यावर बंडू वारटक्के प्रेम कसे करावे याचे मार्ग शोधू लागला. 'प्रेम' या विषयावर काही मार्गदर्शक ग्रंथ मिळाले तर पहावेत या उद्देशाने बंडूने सर्व लायब्ऱ्या, फोर्टातील वडी वडी पुस्तकांची दुकाने आणि फुटकाय पालथे घातले...पण बंडूला हवा होता तसा 'प्रेम' या विषयावरचा मार्गदर्शक ग्रंथ काही मिळू शकला नाही. बंडूला एकंदर लेखक वर्गाविषयी कमालीचे आश्चर्य वाटून राहिले. अखिल विश्वातले निम्मे अधिक वाङमय प्रेम या विषयाभोवती रचलेले असताना प्रेम कसे करावे याची शास्त्रशुद्ध माहिती देणारा मार्गदर्शक ग्रंथ उपलब्ध नसावा याचे बंडूला दुःख झाले. 'मित्र कसे जोडावे?' 'हेअर कटींग कसे करावे ?' दात कसे स्वच्छ ठेवावेत ? मालीश किंवा बुटांना पॉलीश कसे करावे ? इत्यादि सटरफटर विषयांवर भरपूर पुस्तके उपलब्ध असताना प्रेम कसे करावे यावर एकही मार्गदर्शक पुस्तक उपलब्ध असू नये हे होतकरू प्रेमी तरुणांचे दुर्दैव आहे याबद्दल बंडूला शंका उरली नाही. परंतु एवढयाने बंडूचा प्रश्न सुटण्यासारखा नव्हता. वरे, प्रेम ही खाजगी बाब असल्याने कुणाचा सल्ला घेणेही शक्य नव्हते..आणि सल्ला घ्यायचा म्हटले असते तरी "इथे प्रेमविषयक सल्ला देण्यात येईल" अशी पाटी लावून कुणी बसलेला नव्हता. इन्कमटॅक्स कसा चुकवावा ? गुप्त रोग कसे बरे करावे ?' आणि पस्तीशीनंतर "ताकद आणि जोम'

— राजा राजवाडे

असल्या भलत्यासलत्या गोष्टींचा सल्ला देणारे भरपूर असताना प्रेमासारख्या मंगल विषयात मार्गदर्शन करणारा मात्र कुणी नव्हता.. काय करावे ते बंडूला कळेना.

वराच विचार केल्यावर बंडूला वाटले की काव्यात प्रेमाचा नेहमी डंका वाजत असतो. तेव्हा कवितासंग्रहांतून काही मार्गदर्शन मिळाले तर पहावे. कल्पना डोक्यात येताच बंडूने लायब्ररीतील धूळभरले काव्यसंग्रह झटकून वाचायचा सपाटा लावला. वाचता वाचता प्रेमविषयक ओळी आढळल्या की त्या बंडू डायरीत उतरून घ्यायला लागला...सर्व काव्यसंग्रह वाचून झाल्यावर बंडूने डायरी उघडली आणि एकेका कविवचनावर शांतपणे विचार करून तो प्रेमाविषयी मार्गदर्शन मिळते का ते पाहू लागला.

बंडूने उतरून घेतलेले पहिले कविवचन असे होते :

"काटयावाचुन गुलाब नाही
खेटयांवाचून प्रेम नाही !"

या वचनावर बंडूने खूप विचार केला..खेटे घालायलाही त्याची हरकत नव्हती ; पण जिच्या दारी खेटे घालायचे अशी सुन्दरी किंवा प्रेयसी कशी गाठायची हेच त्याला कळत नव्हते ! आणि म्हणून या कविवचनाचा त्याला उपयोग नव्हता. दुसऱ्या एका कवीच्या ओळी अशा होत्या:

"प्रीती मिळेल का हो बाजारी ?"

या ओळीने बंडूला चांगलाच उत्साह दिला. कारण बाजारात सुंदर मुली फिरत असतात हे त्याला ठाऊक होते. दुसऱ्या दिवसापासून बंडू बाजारातून सारखा भटकू लागला... पण अनेक दिवस बाजारात भटकूनही बंडूला काहीच यश मिळाले नाही..मात्र त्याचे दोनदा पाकीट मारले गेले आणि एकदा एका मोकाट

# गड आला नि सिंहही आला

गोमातेने त्याला शिंगावर घेतल्याने त्याचे हसे झाले आणि बंडूच्या बाजारातल्या प्रेमाचा बाजार आटोपला! याच कवितेची पुढची ओळ होती, "प्रीती मिळेल का हो शेजारी?" या ओळीवरोबरच बंडू 'लव्ह दाय नेबर' या बायबलच्या संदेशाचा विचार करू लागला. या दोन संयुक्त वचनाना डोळ्यांसमोर ठेवून बंडूने त्याच्या शेजारी रहाणाऱ्या कु. कुंदा गोखले हिला एक मस्त प्रेमपत्र पाठविले... परतु ते प्रेमपत्र कुंदाच्या हाती न पडता कुंदाच्या पिताजीच्या हाती पडले आणि प्रकरण हातघाईवर आल्याकारणाने बंडूला तेथून काही दिवस मुक्काम हलवावा लागला. तरीही बंडूने हाय खाल्ली नाही. तिसरे एक कविवचन असे होते:

"प्रेम करावे रक्तामधले
प्रेम करावे शुद्धपशूसम –

हे कविवचन शिरसावंद्य मानून प्रेम करण्याची बंडूची तयारी नव्हती. कारण चौऱ्यांयशी लक्ष फेऱ्यांनंतर मिळालेला मानव जन्म सोडून पशू बनणे त्याला मान्य नव्हते... याच कवितेतल्या पुढल्या ओळी अशा होत्या:

"प्रेम करावे असे परतूं
प्रेम करावे हे कळल्याविण!"

या ओळीचा तर बंडूला मुळीच उपयोग नव्हता... कारण प्रेम कसे करावे हे बंडूला कळायला हवे होते आणि कवि मात्र प्रेम करावे हे कळल्यावाचून प्रेम करायला सांगत होता.. बंडूच्या व्यवहारी मनाने विचार केला उगीच प्रेम कसे करावे हे कळल्यावाचून जर प्रेम केले नि तो गोत्यात आला तर हा कवि आपल्याला थोडाच सोडवायला येणार आहे? आणखी एका वचनाचा पडताळा पाहून नंतर हा नाद सोडण्याचा बंडूने निश्चय केला. हे वचन असे होते: "प्रेमात नि युद्धात काहीही चालते –" बंडूने त्याला आवडणाऱ्या समोरच्या अंबू तांबेला ती रस्त्यातून चालली असता जाणूनबुजून धक्का मारला.. आणि काय होतेयं हे कळायच्या आत अंबूच्या पायातली चप्पल बंडूच्या कानशिलावर आदळली!

या प्रकारानंतर मात्र बंडूने प्रेमविषयक कविवचनांचा धसका घेतला आणि पुन्हा आयुष्यात कविवचनांवर विसंबून काहीही करायचे नाही असा कानाला खडा लावून घेतला.

नंतर एक दिवस बंडू असाच निराश मनाने पेपर चाळीत बसला असता एका जाहिरातीने त्याचे लक्ष वेधून घेतले,

"थांबा! निराश होऊन आत्महत्या करू नका!" तुमच्या कुठल्याही अडचणीसाठी

प्रो. आर. तकदीरवाला यांना भेटा.

स्मगलिंग, सट्टाबेटींग, प्रेम, नोकरी या बाबतीत अचूक सल्ला आणि मार्गदर्शन!"

ही जाहिरात वाचताच बंडूला अत्यानंद झाला. अखेर त्याला हवा होता तसला एक तरी इसम दिसला होता. बंडूने आर. तकदीरवाल्याचा पत्ता उतरून घेतला आणि तावडतोब त्याच्याकडे जायचे ठरविले.

प्रो. तकदीरवाल्याकडे येताच त्याने, बंडूच्या हातावर मॅग्नीफाईंग ग्लास ठेवून बंडूच्या हस्तरेषांचे निरीक्षण चालू केले. पाचएक मिनिटांनी तो बंडूला म्हणाला,

"तुम्हाला लव्हर तुमको जंगलमंदी मिलेल. एकदम चोक्कस सांगते. आपण कधी कोनाला झूट नाय सांगते ..ही गोष्ट झूट माहीत पडली पर पचास रुपये फी वापस दूंगा!" फीचा पन्नासाचा आकडा ऐकताच बंडूच्या पोटात गोळा उठला. पण आता काही इलाज नव्हता. प्रो. तकदीरवाल्याच्या हातावर पन्नास रुपये ठेवून त्याने त्याला विचारले,

"हमारा लव्हर दिसने में कैसा होयगा? दहाजणींसारखा की आपला ऐसातैसाच?"

"तुम्हारा प्रेयसी गोरा होयगा – एकदम ब्युटीफुल।"

"उसका नाम क्या होयगा?"

"नाम तो मै बता नही सकता. लेकीन उसके नामका पहिला अक्षर सु होयगा.. जाव बेटा जंगलमे जाव... तुम्हारा मंगल हो जायगा।"

प्रो. तकदीरवाल्याच्या आशीर्वादाने आनंदीत होत बंडू बाहेर पडला.

प्रो. तकदीरवाल्याच्या शब्दांचा बंडू विचार करू लागला.. जंगलात कसे जायचे? बंडू फॉरेस्ट डिपार्टमेंटमध्ये नोकरीला होता हे खरे.. पण.. त्याचे काम ऑफिसात होते. जंगलात नव्हते. विचार करता करता बंडूच्या डोक्यात एक ठिणगी पडली! प्रो. तकदीरवाला जंगल म्हणाला... जंगल म्हणजे फॉरेस्ट... प्रोफेसरच्या शब्दांचा अर्थ आपण फॉरेस्ट डिपार्टमेंट असा लावला तर? तर आपल्या खात्यात 'सु' या अक्षराने सुरुवात होणारे नाव कुणाचे आहे? सु.. सु.. सु.. सु.. हा बरोबर! आहे.. सुषमा सरंजामे. ती गोरी आहे.. दिसायला ब्युटीफुल आहे! बंडने उडीच मारली. प्रो. तकदीरवाल्याने सांगितलेल्या सर्व खाणाखुणा जुळल्या होत्या. आता फक्त प्रेम करायचेच बाकी उरले होते!

सुषमाचा विचार करू लागताच बंडूला वाटले खरेच सुषमा किती गोड पोरगी आहे तशी ती आपल्याशी बोलते चालते. मोकळेपणाने वागते. पण आपण तिला सोडले आणि बाजारी आणि शेजारी प्रेम शोधीत बसलो नि चपला खाल्ल्या! काखेला कळसा नि गावाला वळसा म्हणतात ते हे असे!










दुसऱ्या दिवसापासून बंडूने सुषमाशी बोलणेचालणे वाढविले. गाडी न पकडता तो तिच्याबरोबर बसच्या क्यूत उभा राहू लागला. व बसमधे बसल्यावर तिचे तिकीट काढू लागला. बसचे तिकीट ही प्रेमाच्या स्वर्गात प्रवेश देणाऱ्या पासाची पहिली सुरुवात आहे असे बंडूने कुठेसे वाचले होते.

एकदा ओळख वाढल्यावर. फॅमिली रूममधे चहाला जाणे, फिरायला जाणे, सिनेमाला जाणे आणि प्रेमाच्या आणाशपथा घेणे या पायऱ्या बंडू झपाट्याने चढला आणि एका संध्याकाळी चौपाटीच्या वाळूवर सुषमाजवळ बसला असता त्याने लग्नाच्या विषयाला हात घालायचे ठरवून तो म्हणाला,

"सुषमा ! अहाहा ! हा सूर्यास्त किती काव्यमय दिसतो आहे –"

बाजूला बसलेली सुषमा या वाक्यावर एकदम "ईऽऽ" करून ओरडली. . तिला असे ओरडायला काय झाले ते बंडूला कळेना. आश्चर्यचकित होत्साता बंडू विचारता झाला,

"काय ग, काय झालं?"

"असलं काव्यमय काही बोलू नका. असलं काही ऐकायची मला सवय नाही . . . माणसाने काव्याची गुळगुळीत नि गुळमुळीत भाषा बोलू नये अशी आमच्या वडिलांची शिकवण आहे. ते म्हणतात, माणसानं बोलावं कसं ? सिंहाच्या डरकाळीसारखं. चालावं कसं हत्तीसारखं. खावं कसं वाघासारखं–

तिचे बोलणे मध्येच तोडून बंडू चिडून म्हणाला,

"नि गावं कसं गाढवासारखं !"

"हा माझ्या बाबांचा अपमान आहे बंडू –"

"हे बघ मी असं बोलू नाहीतर काय करू ? मी जरा रोमँटिक बोलायला गेलो तर तू भलतंच पुराण लावलंस . . काय ग, तुझे वडील आहेत तरी कोण पशुपाल की सर्कसचे रिंगमास्टर"

"बंडू . . माझ्या बाबांना एवढे हलके समजू नकोस. ते रिटायर्ड फॉरेस्ट ऑफिसर आहेत समजले ?"

पण रिटायर्ड झाले तरी त्यांचं प्राण्याचं नि शिकारीचं वेड अजून जात नाही . . . त्यांच्या हातात नेहमी बंदूक असते –"

"बाप रे !"

"घाबरू नकोस . . बंडू तुला हे मारणार नाहीत . . . . हां तर काय सांगत होते मी . . आठवलं. तर त्यांच्या हातात बंदूक नि तोंडात 'आय वील शूट हीम' हे वाक्य असतं –" घाबरत घाबरत बंडूने विचारले . .

"काय ग सुषमा तुझे वडील दिसायला कसे आहेत ग ?"

"थांब तुला फोटोच दाखवते" असं म्हणून सुषमाने पर्समधून वडिलांचा फोटो काढून बंडूच्या हाती दिला, तो फोटो पाहून बंडूची तर गाळणच उडाली. कारण सुषमाचे वडील दिसायला भयंकर उग्र होते ! बंडूचा भेदरलेला चेहरा पाहून सुषमा म्हणाली,

"अहो, नुस्ता फोटो पाहून तुम्ही एवढे घाबरलात, मग त्यांच्याबरोबर जन्मभर कसे रहाल ?"

बंडू चिडून म्हणाला,

"मला तुझ्याशी लग्न करायचय् सुषमा, त्यांच्याशी नाही !"

"ते खरं बंडू. पण लग्नानंतर आपणा दोघांना वडिलांजवळच रहावं लागेल. कारण मी वडिलांची एकुलती एक मुलगी आहे. आणि त्यामुळे वडिलांची अशी अट आहे की, जो जावई माझ्याशी रहायला तयार होईल त्यालाच मुलगी द्यायची—"

"सुषमा हे शक्य नाही"

"मग तुझ्याशी लग्न करणंही मला शक्य नाही !" सुषमा ताडकन् उत्तरली. तिच्या उत्तराने बंडूचे धाबे दणाणले आणि बंडूने घरजावई होण्याचे मान्य केले.

अखेर बंडूने सुषमाच्या प्रेमाचा गड सर केला होता..... त्याचे सुषमाशी रीतसर लग्न झाले नि तो सुषमाच्या वडिलांच्या भव्य बंगल्यात नांदायला निघून आला.

बंगल्यात भिंतींवर प्राण्यांची मुंडकी नि शिंगें टांगलेली होती. नि बाबासाहेबांच्या शिकारीचे मोठेमोठे फोटो फ्रेम करून लटकवलेले होते !

बंडूच्या पहिल्या रात्रीनंतरची, थंडीने गुलाबी बनलेली पहाट होती ती ! बंडू सुषमा एकमेकांच्या मिठीत गाढ झोपी गेली होती. तोच बंडूच्या खोलीच्या दारावर धक्के बसू लागले आणि पाठोपाठ बंडूच्या सासऱ्यांची उर्फ बाबांची सिंहगर्जना खोलीत घुमली,

"अहो जावईबापू.... उठा... पांच वाजले..... उठा उठा—" बंडू सुषमा जागी झाली. बंडू सुषमाला चिडचिडून म्हणाला,

"कशाला हाका मारताहेत तुझे बाबा, यावेळी ?"

"व्यायामाला असेल" सुषमा जांभई देत म्हणाली.

"काय व्यायामाला ? " बंडूने खडबडून उठत विचारले."

"हो. व्यायाम हेही त्यांचे एक वेड आहे. अरे मी मुलगी असूनही

परवापर्यंत व्यायाम करीत होते ! व्यायामाशिवाय जीवन व्यर्थ आहे अशी त्यांची प्रामाणिक समजूत आहे."

"अंग सुषमा, पण ही काय व्यायाम करायची का वेळ आहे ? निदान माझी ?"

"हे मला सांगून काय फायदा ? बाबांना सांग काय ते –"

सुषमा हे बोलतेय् एवढ्यात पुन्हा सिंहगर्जना झाली,

"अहो जावईबापू उठा. काय आळशी बुवा तुम्ही तरुण लोक. चला, उठा नि कपडे काढून बाहेर या —"

बंडू चडफडून म्हणाला, "कपडे काढून बाहेर येऊन काय करू?" पण त्याच्या चडफडण्याचा काहीही उपयोग झाला नाही आणि बंडूला सात वाजेपर्यंत जोर नि बैठका काढीत रहावे लागले! काय करतो बिचारा सुषमाच्या प्रेमासाठी त्याला सारे करणे भागच होते.

रात्रीचा साडेनऊचा सुमार होता. व्यायामाने बंडूचे सारे शरीर धरले होते नि ठणकत होते. कधी एकदा खोलीत जातो नि सुषमाला मऊ हातांनी अंग चेपायला सांगतो असे त्याला होऊन गेले होते. तो खोलीकडे निघाला तेवढ्यात बाबासाहेबांची सिंहगर्जना झाली,

"जावईबापू, इकडे या —"

आता ही पीडा काय करायला सांगणार आहे नकळे असे धुटपुटत बंडू दिवाणखान्यात बाबासाहेबांकडे आला नि म्हणाला,

"काय हो ?"

"या बसा. मी प्रसिद्ध शिकारी होतो हे तुम्हाला सुषमाने सांगितले असेलच– "

"हो सांगितलेय् ना."

"ठीक आहे. अशा शिकारी केल्यात, अशा शिकारी केल्यात महाराजा. पूछो मत, अहो आमचं हे सरकार तरी काय विचित्र ! कंपोस्ट खताचे खड्डे खणणारांना बक्षिसे देते. शिकाऱ्यांना नाही. उलट शिकार करायची बंदी करते जंगलात ! "

"अहो. पण बाबा, शिकारीचा देशाच्या विकासाला काय उपयोग ?"

"अहो, प्रत्येक ठिकाणी उपयोग पाहून नाही चालत. रविशंकरच्या सतारीचा काय उपयोग? त्याने काही हरितक्रांती होत नाही असं उद्या एखादा महामूर्ख म्हणेल, पण ते खरं नव्हे! छंद तो तो छंद .... ते जाऊ द्या–" असे म्हणून बाबासाहेबांनी अल्बमचे पान उघडून एका चित्रावर बोट ठेवून ते म्हणाले,

"हा आमचा पहिला बळी – !"

बाबांचा उत्साह पाहून बंडूला वाटले की आता आपण बाबासाहेबांच्या शिकारकथांची शिकार बनणार नि आपली दुसरी रात्रही बळी जाणार ! आपल्याला झोप आली आहे हे त्यांना कळून, त्यांचा उत्साह ओसरावा या उद्देशाने बंडूने एक कृत्रिम जांभई काढली, पण त्याचा बाबासाहेबांवर काहीही परिणाम झाला नाही. उलट त्यांनी आपली तपकिरीची डबी बंडूपुढे फेकली व ते म्हणाले, "हं ही ओढा जरा म्हणजे झोप हटेल " तपकिरीची ती डबी पाहून बंडूला "तपकिरीने वाचविले" हा एका शिकाऱ्याला तपकिरीने वाघापासून कसे वाचविले हे सांगणारा शालेय धडा आठवला आणि त्याला वाटले, आज एक शिकारीच आपल्याला त्याच तपकिरीने मारीत आहे !

बाबासाहेबांच्या 'पहिल्या बळीची' तडफड थांबली तोवर बारा वाजून गेले होते. बाबासाहेबांचा निरोप घेऊन तो आपल्या खोलीत झोपायला आला तोवर सुषमा कंटाळून गाढ झोपी गेली होती !

ठणकणाऱ्या अंगानेच त्याने रात्र तळमळत काढली आणि पहाटे जरा कुठे डोळा लागतोय तोच बाबासाहेबांची सिंहगर्जना झाली,

"जावईबापू . चला उठा पांच वाजले. ....

बाबासाहेबांना बंडूच्या रूपाने हक्काचा श्रोता मिळाल्याने अरेबियन नाईटस्च्या पद्धतीवर बाबासाहेब एकेका बळीची चित्तथरारक गोष्ट सांगू लागले आणि त्यामुळे बंडूच्या रात्री प्रणयाच्या गुलाबी रंगाने रंगण्याऐवजी रक्ताच्या लालभडक रंगाने रंगू लागल्या! सुषमाच्या कोमल स्पर्शाने त्याचे अंग मोहरण्याऐवजी वाघसिंहांच्या डरकाळ्यांच्या वर्णनांनी त्याचे अंग शहारू लागले. त्याला स्वप्नातही वाघसिंह दिसू लागले नि बंडू घाबरून झोपेतून उठू लागला. एकदा तर स्वप्नात एक सिंह त्याच्या अंगावर चालून आला आणि आश्चर्य असे की त्या सिंहाचा तोंडवळा थेट बाबासाहेबांच्या तोंडवळ्यासारखाच होता ! हे विचित्र स्वप्न त्याने भाबडेपणाने जेव्हा सुषमाला सांगितले तेव्हा सुषमा रागाने लाल झाली नि म्हणाली, "हे बघ, मला माझ्या वडिलांबद्दल असं बोललेलं आवडणार नाही असं बोलू नको तू. "

"मग काय करू ? तुझी गोडगोड कुजबुज ऐकायचं सोडून तुझ्या बाबांच्या भाकड शिकारकथा ऐकत बसू?' सुषमा, मी फेडप् झालो आहे अगदी."

" असं म्हणून कसं चालेल ? "

" कसं चालेल काय ? चाललंच पाहिजे ! मला या शिकारखान्यांत इतःपर रहायचे नाही..... चल जाऊ या आपण..... कुठेही राहू – "

"ते शक्य नाही बंडू.... तू अट विसरलास... तू बाबांकडे रहायची अट कबूल केली आहेस, तेव्हा तू म्हणाला होतास "सुषमा तुझ्यासाठी तुझ्या वडिलांबरोबर काय पण एखाद्या राक्षसाबरोबरही रहायला मी तयार आहे, नि आता शब्द फिरवितोस ? तुझे प्रेमच नाही माझ्यावर..... अं ऽऽ अं ऽऽ अं ऽऽ ......" असें म्हणून सुषमा रडू लागली. ती रडू लागताच बंडू गांगरून गेला. अशा वेळी बायकोची समजूत कशी काढायची याचा त्याला अजून अनुभव नव्हता. तो गुडघे टेकून तिला शरण गेला. त्याने माफी मागितली. तिच्यावर "फार फार फार्रर्रर्ऽ" प्रेम असल्याचे सांगितले तेव्हा कुठे सुषमा रडायची थांबली. रडायची थांबली तशी सुषमा बंडूला म्हणाली,

" हे बघ, माझ्या लाडक्या, मला असं छळायचं नाही, माझ्या बाबांना दुखवायचं नाही. तसं तू केलस तर मी समजेन तुझं माझ्यावर प्रेम नाही, हां ! लाडक्या तू माझ्या प्रेमाचा गड सर केलास तो कशासाठी का ?"

चेहरा गंभीर करीत बंडू म्हणाला,

"ते खरं लाडके, पण त्याचा काय उपयोग ? तुझ्याबरोबर.... तुझे बाबाही बंदुकीसह माझ्या जीवनात घुसले! अरेरे! काय झाले हे! गड आला आणि सिंहही आला ! " बंडूच्या त्या गंभीर उद्गारांनी सुषमाला हसू कोसळले आणि ती लटक्या रागाने म्हणाली, "चल चावट कुठला ! "







अनुक्रमणिका




...याक पुळ्वट ? ...तुम्ही मराठी जना झगडेबाज....
पण कानडी जना कमी इळ्ळा याद इळ्ळा...
कारवार-बेळगांव कदापि साध्य इळ्ळा... ते कानडीतच
कन्नडिगांचे, समर्थन करीत होते...

**—सौ. ललितागौरी कपळी**

कर्नाटकातल्या अगदी अस्सल कानडी माणसाशी मी लग्न जुळवलं नि आमच्या घरात जणु ॲटमबॉंब पडला. यांच्या घरातून कानडीत व आमच्या घरातून मराठीत अगदी कडवा विरोध झाला. परंतु आम्ही कुणालाच दाद दिली नाही.

लवकरच आमचं लग्न झालं. उंबरठ्यावरचं मापट ओलांडून मी माझ्या हक्काच्या घरात प्रवेश केला. सुनेचं नांव ठेवण्याची वेळ आली. बायकांच्या कानडी कलकलाटातला एक शब्द मला समजत नव्हता, परंतु त्यांनी सुचवलेली नावं ऐकली व माझे डोळे खाड्कन् उघडले. इश्य! कसली ती नांवं! म्हणे व्यंकटलक्ष्मी, चूडामणी, भ्रमराम्बिका. प्रिया, पल्लवी, मेधा, मुग्धा, असली कलापूर्ण नांवं ऐकण्याची सवय असलेली मी अखेरीस यांना हळूच म्हणाले, "ही हो कसली मेली घाणेरडी नांवं ? दुसरं कुठलं तरी छानसं नाव ठेवा ना गडे."

माझं बोलणं न आवडून हे नापसंतीच्या स्वरात म्हणाले, "राणीसरकार हा महाराष्ट्र नव्हे ! कर्नाटकात अशीच नावं ठेवण्याचा प्रघात आहे."

तोंडात मारल्यासारखी मी चूप झाले व कु. सुशीला काळेची सौ. चूडामणी वसंतराव झाले.

लवकरच आमचा राजाराणीचा संसार मुंबईत सुरू झाला. बरोबर माझं कानडी शिकणंही. शाळा कॉलेजात स्कॉलर म्हणून गाजलेली मी, परंतु इथे मात्र माझी मात्रा चालेना. कानडी माणसाबरोबर ग्रह जुळले पण भाषेबरोबर जुळेनात. एक अक्षर डोक्यात उतरेल तर शपथ. हे मोठ्या उत्साहाने शिकवत परंतु इकडे उपड्या घागरीवर पाणी असे. शेवटी चिडून हे म्हणत, "तुम्ही मराठी लोक फार अहंकारी. दुसरी भाषा तुम्हांला शिकायला नको. तसं पाहिलं तर कानडी मराठीची आई." मी मनात म्हणे आई असो नाहीतर बाप असो. संसार चांगला झाल्याशी कारण आणि नेमका तोच या भाषावादापायी होईना.

त्या दिवशी यांच्या दूरच्या नात्यातली कुणी मंडळी जेवायला आली होती. यांच्यासकट सर्वचजण एकदम जेवायला बसली. अर्धेअधिक जेवण झाल्यावर पाहुण्यांच्या बरोबर असलेला मुलगा त्याच्या आईला म्हणाला, "अम्मा पुरे." अन् नमका त्याचवेळी फोन कडमडला. पानावरून उठता उठता हे म्हणाले, "घारुला एक पुरी घाल ग." घारूच्या पानांत काहीच नव्हतं. पाठीमागचा ताकभातही संपवला होता त्यानं. तरी आपला "पुरे पुरे" करीतच होता तो. इतकं "पुरे पुरे" केल्यावर माणसानं वाढायचं तरी कसं अन् काय ?

बघता बघता समोरचं खेळकर वातावरण बदललं. चेहेरे आक्रसले गेले व घारूच्या पाठीत जोराचा रट्टा बसला आणि कानडीत शिव्यांचा गिरसप्पा धडाधडा कोसळू लागला. घारूनं जोरात भोकाड पसरलं. मला कळेना काय चुकलं ते इतक्यात हे आत आले. आतला रागरंग बघून म्हणाले,

"हे काय घारूला पुरी नाही वाढलीस?"

"इश्य! त्यानं पुरी मागितलीच कुठे? सारखा "पुरे पुरे" करतो आहे तो."

'म्हणजेच वेंधळे तो पुरी मागत होता.'

'अहो पण मला काय माहित 'पुरे' म्हणजे 'पुरी' म्हणून !'





अनुक्रमणिका

'चांगलं! इतका कॉमनसेंन्स तुला वापरता येईना!' रंगाचा बेरंग झाला व वाईटपणा माझ्या पदरात पडला.

स्वयंपाकात यथातथाच असलेली मी.... पुरणपोळी देखील उत्तम करू लागले. पण हे भाषा... अहं! तिथे आमची डाळ शिजेना. यांची धुसफूस वाढू लागली. मराठी-कानडीचा वादंग घरात माजू लागला. घराला सीमा प्रदेशाचं स्वरूप आलं.

एके दिवशी संध्याकाळी घरी येऊन हे म्हणाले, "उद्या मावशीबाई जेवायला येणार आहेत. मस्तपैकी पुरणपोळीचा कार्यक्रम झाला पाहिजे. काय?"

"जरूर. पण कानडीत पुरणपोळीला काय म्हणतात हो? हां! उगीच आयत्या वेळी गोंधळ नको या भाषेच्या अडचणीपायी."

"होळगे" हे संतुष्ट होत म्हणाले. "असा जर इंटरेस्ट घेशील तर लवकर कानडी शिकशील बघ. खरं म्हणजे कानडी सोपी आहे. व्याकरण शिस्तबद्ध आहे. जेंडर्सचा गोंधळ नाही. पण तुम्ही मराठी लोक फार फॅनॅटिक बुवा.........वगैरे वगैरे.

यांचं बोलणं एका कानानं ऐकून दुसऱ्या कानानं मी ते सोडून दिलं. म्हटलं उगीच सीमा प्रकरण चिघळायला नको.

दुसऱ्या दिवशी रेशमासारख्या मऊसूत तेलावरच्या पुरणपोळ्या केल्या मी. हे व मावशीबाई जेवायला बसले. पहिला भात संपताच हे म्हणाले, "चल आण बोव्वट वाढायला."

बोव्वट! मी चार फूट उंच उडाले. हे ग कुठलं बाई बोव्वट? मी नवलात पडले.

"मी नाही हं केलं बोव्वट बिव्वट.

"काय? बोव्वट केलं नाहीस? अग पण काल तुला मी सांगितलं अन् तूही कबूल केलं होतंस.

"मुळीच नाही," माझं ठाम उत्तर.

यांचा सात्त्विक गोरा चेहरा टमाटयाला लाजवेल असा रागानं लाल झाला. मीही चिडले. यानी मला कधी तो भयंकर पदार्थ करायला सांगितला नाही तर मी तरी कशी कबूल होऊ?

"सांगितलं होतं." हे बेंबीच्या देठापासून ओरडले.

'मुळीच नाही.

'सांगितलं होतं, सांगितलं होतं. सांगितलं होतं.'

'मुळीच नाही, मुळीच नाही, मुळीच नाही.'

हात आखडून मावशीबाई नवीनं समोरचं नाटक बघताहेत हे लक्षात येताच आवाज खाली आणून हे म्हणाले, "ठीक आहे नाही ना केलस बोव्वट? पण कृपया तुमचा तो प्रसिद्ध "च" इथे वापरू नको. It comes upon my nerves. झालाच पाहिजे, मुळीच नाही, काय बुद्धी फिरली व ही मराठी आग पत्करली."

एक भाषावाद सोडला तर आमच्या संसाराचं संगीत सुरेल व सुसंवादी होतं. त्यामुळे घायाळ होऊन रडत रडत मी म्हणाले "तुम्ही होळगे सांगितलं ते मी केलं. 'बोव्वट' हा शब्ददेखील मी प्रथम ऐकते तर ते मी कसं करणार?"

हे पोट धरधरून हसायला लागले. यांचं हसणं संपेना व माझं रडणं सरेना. शेवटी हे म्हणाले, "अग वेडे, बोव्वट म्हणजेच होळगे उर्फ पुरणपोळी. धारवाडकडे पुरणपोळीला होळगे म्हणतात तर बंगलोर म्हैसूरकडे बोव्वट म्हणतात.

झालं का? अशी ही चमत्कारिक भाषा! मावशीबाई गेल्यावर मी यांच्या कानडी भाषेची यथेच्छ टिंगल केली व शेवटी नाक मुरडून म्हणाले, "अहाहा, काय पण दिव्य भाषा! कुणाचा पायपोस कुणाच्या पायात नाही अन् म्हणे मराठीची आई. आमच्याकडे खानदेश, रत्नागिरी, पुणे या भागातल्या मराठीत फरक दिसून येईल. पण तो किती, तर उगीच थोडा. नाहीतर हे ध्यान."

माझ्या या भाष्यावर यांनी जे तांडवनृत्य केलं, जो थयथयाट केला, तो अत्यंत भयानक स्वरूपाचा होता. मराठी भाषेला यांनी शिव्यांची लाखोली वाहिली. माझ्या माहेरच्या वेचाळीस पिढ्या यांनी स्वर्गातून खाली उतरविल्या.

मग माझ्या धमन्यांतून सळसळणारं अस्सल मराठी रक्त कसं स्वस्थ बसणार? ते ही उसळून उठलं. मीही काही कमी बोलले नाही हो! शेवटी तर यांना ठणकावून सांगितलं,

"एक दिवस असा उगवेल की त्या दिवशी बेळगांव-कारवार महाराष्ट्रात सामील होतीलच होतील. मग बसा तुम्ही पुळचट लोक हात चोळत.

"अरे कुणाची माय व्याली आहे बेळगांव-कारवार महाराष्ट्रात घालण्याची हे अस्सल मराठीत तारे तोडू लागले. "अरे रक्तपात होईल रक्तपात. मग समजेल कोण पुळचट ते!" थोडक्यात प्रकरण आटोपलं. नाहीतर माझाच रक्तपात होण्याची वेळ आली होती.

त्या दिवशी अगदी मनापासून वाटलं कुठून झक मारली अन् कानडी माणसाच्या गळयात माळ घातली. या भाषावादापायी सोन्यासारखा संसार वाऱ्यावर सोडण्याची वेळ येते की काय अशी पाल मनात चुकचुकू लागली.

पण तसं घडायचं नव्हतं. बंगलोरच्या आकाशवाणीत यांना मोठ्या अधिकाराची जागा मिळाली व आम्ही मुंबई सोडून बंगलोरला येऊन थडकलो. बंगलोरची ती थंड हवा, ते शांत वातावरण, प्रशस्त घर, मुबलक तांदूळ, फुलाफळांची रेलचेल, कशीचंच अप्रूप मला वाटेना. मराठी पुस्तक हातात पडेना की रेडिओवरील 'आपली आवड' ऐकू येईना. शेवटी हे चिडून म्हणाले, "महिना ३०० रुपये टाकतो. खुशाल मुंबईला जाऊन रहा. What can one expect from a fanatic Maharashtrian?"

हळू हळू मी ताळयावर आले. शेजारी ओळखीपाळखी होऊ लागल्या. परंतु माझ्या झिरझिरीत साड्या, स्लीवलेस पोलकी, केसांची पोनीटेल, ओठांचा रंग, या माझ्या आधुनिक रहाणीने इथल्या बायका माझ्या जवळ फिरकेनात. परंतु माझ्या चूडामणी






## मोफत सर्व्हिस

कचेरीतली भर दुपारची — लगीनघाईची वेळ !
अकौंटंटच्या खोलित चाले — अंकांचा किचकट मेळ ॥
अकौंट जमले का, बघण्याची — घाई मनि साहेबाला,
खाडखाड तो बूट वाजवित — तरातरा खोलित शिरला ॥
काय कल्पना बिचाऱ्यास ती — अकौंटंट बेरिज करितो !
एकामध्ये एक मिळवुनी — उत्तर एकच दाखवतो ॥
लेडी क्लार्क उभी मेजाशी — अकौंटंटच्या भुजपाशी
ओष्ठद्वय ते दृढ भिडलेले — बेरिज चाले ही खाशी ॥
साहेबी बुटांची खडखड — अन् दाराची करकर ती
कोण्याही आवाजे न चळे — प्रणयी युगुलाची प्रीती ॥
संतापुनि साहेब उसळला — "ठोंबे, बाजूला सरका ;
तुम्ही दोघेही याच्यासाठिच — पगार इथला घेता का ?" ॥
ठोंबे थिजला, बाजुस सरला — धीराने परि उत्तरला —
"मोफत करतो आम्ही काम हे !" — फीट आली साहेबाला ॥

— श्रीराम गुळवणे

नावानं जादू केली. मंगळवारी शुक्रवारी हळदी कुंकवाची बोलावणी वाढू लागली.

ऐक शब्द कानडी, दहा इंग्रजी, कधी खाणाखुणा, या रीतीनं मी दडपून कानडी बोलू लागले.

चैत्राचा महिना उजाडला अन् मी चैत्रगौरीच्या हळदीकुंकवाची जोरात तयारी केली. गौर चांगली सजवली. मस्त आरास केली. कैरीच्या पन्ह्याऐवजी मुद्दाम आईस्क्रीम ठेवलं. पाच वाजल्यापासून मीही गौरीसारखी सजून बायकांची वाट पाहू लागले.

साडे पाच वाजले, सहा झाले, सातचे टोले पडले, आठ वाजण्याची वेळ आली तरी परकऱ्या पोरी, प्रौढ कुमारिका, ४१५ नायडूंच्या बायका याशिवाय एक सवाष्ण फिरकेल तर शप्पथ, लिंगायताची बाई फिरकेना की ब्राम्हणबाई येईना.

हळदीकुंकवासाठी म्हणून मुद्दाम रेकॉर्ड करून आणलेली बिस्मिल्लाची सनई टेपरेकॉर्डवर सुरात वाजतच राहिली. पूरियाधनश्रीचे शांत स्वर वातावरणाचे माधुर्य वाढवित होते. बायकांना देण्यासाठी आणलेले मोगराचे गजरे उमलून सुगंधाची उधळण चौफेर होत होती. नटूनथटून बसलेली गौराई मिस्किलपणे माझ्याकडे बघून हसत होती व मी रडण्याच्या बेतात होते.

दुसऱ्या दिवशी या रहस्याचा उलगडा झाला. आईस्क्रीममध्ये अंडे असेल या भीतीने लिंगायत बायका व माझ्या तीन दिवसांच्या अडचणीत मी दूर बसत नसल्याने ब्राम्हण बायका..... एकूण कुणीच हळदीकुंकवाला आलं नव्हतं.

झाल्या प्रकारानं मी हाय खाल्ली. जबरदस्त धक्का बसला माझ्या मनाला. यातून मी बाहेर पडले ती पूर्वीचं राहिले नव्हते. संपूर्ण कायापालट झाला होता माझा.

आणि काही दिवसांनी मी माझा निर्णय जाहीर केला. माझ्या तीन दिवसाच्या अडचणीत मी दूर बसायचं ठरवलं होतं. यांना माझा निर्णय मुळीच आवडला नाही. हे कातावून ओरडले,

"अग पण मी ऑफिसला जाऊ की स्वयंपाक करू महामाये ?"

"अगोदर स्वयंपाक करा, मला वाढा, तुम्ही जेवा व मग ऑफिसला जा." मला उपाशी ठेऊन स्वतःही न जेवता हे तणतणत ऑफिसला चालते झाले. पण संध्याकाळी घरी येऊन यांनी मुकाट्यानं स्वयंपाक केला व मग माझ्या अडचणीत हे नेहमीच स्वयंपाक करू लागले.

माझ्या पोशाखातही मला असाच बदल करावा लागला. त्याशिवाय गत्यंतरच नव्हतं. शेजारच्या आउटहौसमध्ये रहाणारी कमलम्मा व मी एका लग्नाला निघालो होतो. मी भारीपैकी शिवसंभव साडी नेसले, चार ठळक सोन्याचे डाग अंगावर चढवले. कमलम्माकडे मला बघवेना. काठ, पदर, मधलं अंग, यांची जराही रंगसंगती नसलेली, कांजीवरमची भडक जरीची साडी आणि तांबड्या रंगाचे दागिने. तिच्या त्या अवताराचं मला खूप हसू आलं.

परंतु लग्नमंडपात शिरताच एकदम ट्रॅन्सफर सीन झाला. आत जाताच ४१५ बायका लगबगीनं पुढे आल्या. मला वाटलं मी मोठ्या अधिकाऱ्याची बायको म्हणून आल्या बापड्या धावत स्वागताला पुढे; पण कसचं काय ? त्यांनी येऊन कमलम्माला वेढलं. तिची भडक साडी हात लावून बघितली. तिच्या तांबड्या सोन्याचं कौतुक केलं व मोठ्या मानाने तिला खुर्चीवर नेऊन बसवलं. माझ्याकडे कुणी ढीम्म बघेना. उलट तिनेच माझ्याकडे चक्क बोट दाखवून काही तरी सांगायला सुरूवात केली. सर्वजणी मला विचित्र नजरेने निरखू लागल्या. एक दोघींनी तर जवळ येऊन मी घातलेला सोन्याचा लप्फा निरखून बघितला व नाक मुरडून म्हटलं, "अय्ययो! सोनं कसं बाई इतकं पिवळं धम्मक? चांदी मिसळलेली दिसते आहे सोन्यात." अन् मग माझ्या हलक्या पातळाचा व्यवस्थित समाचार घेणं सुरू झालं.

हळदीकुंकू घेऊन मी घरी आले. प्रथम सर्व झिरझिरीत साड्या ट्रंकेच्या तळाशी गाडल्या व रेशमी साड्या घेण्याचा सपाटा लावला. कांजीवरम्, धर्मावरम्, बॅंगलोर, सिल्क, म्हैसूर, सिल्क बिन्नी, एकेका साडीची किंमत दिडशेच्या वर ! पैसे देताना



अनुक्रमणिका







हे चांगलेच कुरकुरत, "काय हा अनाठायी खर्च. मुंबईत २०-२२ ची वायल, ४०–४५चं नायलॉन घेतलं की भागत होतं. इथे सगळा पगार साड्यात खर्च. अन् मला मात्र काही नाही. मी आपला हा असा उघडावंब भोलानाथ "

मी हसून म्हणे, "देश तसा वेष. मी कांजीवरम् नेसते, तुम्ही गुडघ्यापर्यंत दुमडून लुंगी गुंडाळा. लुंगीसारखा साधा सुटसुटीत पोशाख हाच राष्ट्रीय ड्रेस ठरवायला हवा. पाहिजे कशाला ते टेरेलिन नि वुलन ?

मुंबईचे लोक घामाच्या धारा अंगावरून ओघळत असताना कशाला सूटपँट घालतात देव जाणे. त्यांच्यावर तर कायद्यानं लुंगी गुंडाळण्याची सक्ती करायला हवी."

"माझे आई" म्हणून कोपरापासून यांनी मला हात जोडले.

बँगलोरला येऊन यांना सर्दीचा खूपच त्रास होऊ लागला. माझी एक कानडी मैत्रिण माझ्या कानात कुजबुजली, "अय्यो ! चपात्या उष्ण. बँगलोरच्या थंड हवेत त्या कशा पचणार ?" झालं ! मी चपात्या करणं सोडून दिलं अन् यांची सर्दी कुठल्याकुठे पळाली. हे चरफडले,

"असं काय डोकं फिरल्यासारखी वागत असतेस तू? सर्दीचा अन् चपातीचा संबंधच काय ? लहानपणापासून चपाती खाण्याचा सराव........"

"उगीच डोक्यात राख घालू नका." माझा मधेच कांगावा. "इथल्या हवेला नाही सोसत ते कदान्न. सल्ला देणारे का आमचे शत्रू आहेत ? ते नाही का गिळत पिंडाचे गोळे ? तरी बरं, आमचे पुढारी रोज बोंब मारताहेत, "अरे Change your food habits पण तुम्हांला काय त्याचं! अशानं Country is going to dogs चपात्या नसल्याने माझा स्वयंपाक फार सुलभ झाला. सकाळीच भाताचं तपेलं चुलीवर चढवायचं, थोडीशी डाळ शिजवून वरच्या पाण्याचं रसम् करा-यचं.उरलेल्या डाळीत एखादी भाजी घालून तिच्यात वरीच चिंच कोळून सार तयार व्हायचं, की आला स्वयंपाक. येता जाता यांच्या तोंडावर इडली, डोसा, उप्पीट, मेसूरपाक, फेकला की यांचं वाकडं तोंड हसरं होत असे. उपवासाला मात्र न चुकता मी चपाती करीत असे.

प्रथम उपवासाला केलेली चपाती बघताच, तिसरा डोळा उघडून यांनी जे भयानक तांडवनृत्य केलं ते या जन्मी विसरणं अशक्य आहे. परंतु हा तिसरा डोळा बायकोला भस्मसात करण्यास असमर्थ आहे हे जेव्हा बऱ्याच उशिरानं (थकल्यामुळे) यांच्या लक्षात आलं तेव्हा हे कळवळले, "अगं कशी ग तूं पछाडल्यासारखी वागत असतेस ? इथला का हा उपवास आहे ? एक भात हादडायचा नाही, बाकी तांदूळाचे सर्व पदार्थ.....इडली, डोसा, पोहे खायचे ? उपवासाला का कुणी उप्पीट, चपाती खाल्ली आहे ?"

"मग गाडाभर साबुदाण्याची खिचडी वाढू का ? " माझा छद्मीपणा.

"अहाहा, धन्य तो महाराष्ट्र व धन्य ते उपवास. ती रुचकर साबुदाणा खिचडी, दाण्याचं कूट घालून केलेली बटाट्याची भाजी, खारे दाणे, शिंगाड्याचा शिरा, राजगिऱ्याचे लाडू, रताळ्याचा कीस बटाटा-थालीपीठ, जिभेला चटका लावणारं दाण्याचं कालवण, रुचकर भगर, खमंग चटणी, घट्ट दही..... अहाहा......

"हे जिभेचे चोचले राहिले वरं तुमच्या लाडक्या महाराष्ट्रात ! या मराठी लोकांना एक अक्कल नाही म्हणून तुमची कानडी अक्कल का तुम्ही गहाण टाकावी ? देशाच्या विभक्तीला हा खादली सूचनेचं काय ? सुटलेल्या पोटाचा काही विचार ? मुका-ट्यानं डायटिंग करायला लागा. आणि मुंबईला कोणही चिडवत होतं. एकादशी दुप्पट खाशी म्हणून ?"

"अग ती चेष्टा होती ग, चेष्टा होती वरं ती." हे विव्हळू लागले.

"सुटलेलं पोट" हा यांचा Weak point असल्याने हे विव्हळले विव्हळले अन् मुकाट्यानं कमरेवर हात मारून कानडी उपवास करू लागले.

लग्नाला सात वर्ष होऊनही घरात पाळणा हालला नव्हता. परंतु बँगलोरला येताच बाळाच्या आग-मनाची चाहूल लागली. पहिल्या बाळंतपणासाठी माहेरी जाणं क्रमप्राप्त होतं. परंतु आईच्या आजारपणामुळे बाळंतपण बंगलोरला करायचं ठरवलं.

योग्य वेळी प्रसूत होऊन मला मुलगी झाली. काळेभोर मखमली जावळ व गुलाबी गोरा रंग... अशा मोहक कन्येच्या दर्शनाने यांचं अंतःकरण उचंबळून उठलं. हे म्हणाले "कशी ग राजस आहे आपली बेबी! हिचं नाव ठेवूया स्विटी किंवा पिंकी....

"ईऽऽ! " अंगावर झुरळ पडल्यासारखे मी शहारे दिले. "हे का नाव ? नको ग बाई! आपण किनी हिचं नाव वरारोहा अगर








कामवर्धिनी....... किंवा चित्रघंटा, कसं वाटतं ?"

"काय ?" यांचा धसका "कशी ग शुक्राची चांदणी आहे आपली लेक अन् तिचं नाव काय तर म्हणे वरारोहा...... कामवर्धिनी....... चित्रघंटा..... ? "

"होऽऽऽक्का ! अगबाई, मी नव्हते का शुक्राची चांदणी? पण माझं नाव ठेवलंच ना चूडामणीऽऽ! हा कर्नाटक आहे महाराज. इथं असलीच नावं ठेवण्याचा प्रघात आहे. कशाला हवी ती आधुनिक नावं.... मुग्धा, प्रिया, मेधा ? छी.....छी..... बेबीचा मुका घेण्याकरिता मी खालती वाकले. वरती मान केली तेव्हा हे खोलीत नव्हते.

घरी आल्यावर एक दिवशी हे म्हणाले, बेबीच्या पाठीवर २/३ वर्षं काही नको. तुलाही त्रास नको व तिचेही हाल नको."

"अहो बोलताय काय ?" बाजेवरून उठत मी किंचाळले, "सात वर्षांनी ना घरात पाळणा हालतोय अन् परत २/३ वर्षं काही नको ? म्हातारपणी का. "

"गाढवासारखी वकू नकोस." हे भडकले देशाची परिस्थिती. . . ."

"देशाला काय धाड आलीय! सात वर्षं मूल न होण्यात केलंच आहे ना contribution आम्ही देशाला ? "

"अग ए अशिक्षिते, जरा तोंड आवर महामाये. मुंबईला कुटुंब-नियोजनावर कोण व्याख्यान झोडत होतं ? "

"हो पण ते मुंबईत. कर्नाटकात नियोजनाची जरूरीच काय ? भरपूर खायला प्यायला, इथं काय कमी आहे म्हणून मुलं नको ? ते काही नाही. चित्रघंटेला भाऊ झालाच पाहिजे." माझा लाल चेहरा, थरथरणारे हातपाय पाहून हे मुकाट्याने गप्प झाले.

आणि तीन महिने होताच मी परत गरोदर राहिले. हे गंभीर होऊन घरात वावरू लागले. या खेपेला मला मुंबईला धाडण्याचा यांनी चंग बांधला. आईचंही येण्याबद्दल पत्र आलं. पण मी यांना स्पष्ट सांगितलं की 'बाळंतपणासाठी मी मुंबईला जाणार नाही.'

"कां अशी चळ लागल्यासारखी वागत असतेस तू ?" हे कातावले.

"चळ लागलाय तुम्हाला. तिथं जाऊन खाऊ काय ? तिथं का ताटभर भात मिळणार आहे की, प्यायला भरपूर ब्रॅण्डी आहे ? पाण्याचा देखील तिकडे दुष्काळ. तांब्याभर पाण्यात कशी काय बाळंतीण आंघोळ करणार ? मी मुळीच जाणार नाही मुंबईला."

"अग पण तू हॉस्पिटलात गेल्यावर बेबीकडे कोणं बघणार बरं ?" यांचा समजूतदारपणा.

"पण मी मुळी हॉस्पिटलात जाणारच नाही. घरीच बाळंत होणार आहे मी. "

"काय ?" यांची चार फूट उडी.

"होय बरं ! घरीच होणार आहे मी. माझ्या मैत्रिणी घरीच बाळंत होतात. नर्स घरी येऊन सर्व बघते. कशाला २००—३०० रुपये दवाखान्याच्या उरावर घालायचे ?" हे जे उठले ते निघाले की संन्यास घ्यायला. शेवटी मीच पडतं घेऊन म्हणाले,

"ठीक आहे. मी हॉस्पिटलात जाईन; पण मुंबईला मात्र जाणार नाही."

"पण मग बबीकडे कोण बघणार ?"

अरेच्चा ! परत तेच. "अहो असं काय करता वेड्यासारखं ?" मी करवादले.

"मी मेले तर बेबीकडे तुम्ही बघणार नाही का ? " माझ्या मरणाच्या कल्पनेने हे कासावीस झाले व माझं मुंबईला जाणं रद्द झालं.

यांच्यावर सूड म्हणून की काय दोन जुळ्या मुलांना मी जन्म दिला. यांचा पडलेला चेहरा अर्थातच मुलांना बघून उजळला. हे म्हणाले, "या वेळेस मुलांची नावं मी ठेवणार. एक "सतेज" व दुसरा " मी कानात दट्टे घातले. म्हटलं घरी जाऊन घेऊ या समाचार.

परंतु बारशाच्या दिवशी एकाचं नाव ठेवलं वीरभद्र व दुसऱ्याचं सत्यनारायण. यांच्या भकास चर्येकडे बघून मी म्हणाले, "एका दगडात दोन पक्षी. वीरभद्रामुळे लिंगायत लोक नाराज होणार नाहीत तर सत्यनारायणामुळे ब्राम्हण." माझ्या बहिणीचं पहिलं बाळंतपण मी बँगलोरला केलं. ती हॉस्पिटलमधून घरी आली व आमचं रोज वाजू लागलं. अखेरी तिनं आपल्या नवऱ्याला बोलावून घेतलं. तोही आला... वाईलवेडा. त्याचं म्हणणं की मी त्याच्या बायकोला निगलेक्ट केलं. डींकमेथ्याचे लाडू, बदामाच्या वड्या, अळीवाची खीर यातलं काहीही दिलं नाही. नुसते भाताचे गोळे भरवले म्हणे. चांगलं ! ही गाढवी सांगणार व हा नालायक विश्वास ठेवणार. त्याच्या दसपट आवाज काढून मी ओरडले, "अरे या नसत्या लाडवांचा व बाळंतपणाचा संबंधच काय ? आमची काय बाळंतपणं झाली नाहीत ? कशाला हवेत डींकमेथ्यांचे लाडू ? रोज तीन वेळा साय घालून दूध ढोसते, रात्री ब्रॅण्डी पिते. सर्व औषधं घालून केलेला लेह गिळते. गरम गरम भात, तूप, मेणसूं सार (काळ्या मिरीचं) हादडते, हंडाभर उकळत्या पाण्याने न्हाते. काय कमी केलं निलाजऱ्या तुझ्या बायकोला ? डींकमेथ्याचे लाडू खाऊन काय म्हशी व्हायचंय ? थू--- काय तुम्ही मराठी लोकं! "

रागामुळ मला धड बोलता येत नव्हतं. आणि नाहीतरी आजकाल मला मराठी मुळीच बोलता येत नाही. एक शब्द मराठी तर दहा कानडी. कुत्र्याचे पाय मांजराला तर मांजराचे कुत्र्याला. आणि शिवाय माझ्या वेषभूषेतही खूप बदल झालेला आहे. कानातल्या हिऱ्यांच्या कुड्या, नाकातली चमकी, हातभर बांगड्या, ठसठशीत कुंकू, डोळ्याच्या बाहेर उडी मारून आलेलं काजळ, घट्ट वेणी, त्यावरची भरमसाट फुलं, भडक पातळ, कानांच्या पाळ्यांपासून हनुवटीपर्यंत ओढलेले हळदीचे पट्टे. माझं आपादमस्तक निरीक्षण करणारा भाऊराया एकदम गदगदून म्हणाला,

"वसंतराव, कुठे आहे ती पूर्वीची अल्लड ताई ? कुठली ही महाभयंकर म्हैसूरअम्मा जन्माला आली हो ?"








"काही विचारू नका बाळासाहेब. वेडी झाली वरं तुमची वहीण." हे हिरवे पिवळे गळे काढू लागले. नागाच्या वारुळाची पूजा, अश्वत्थ वृक्षाला प्रदक्षिणा, हरिकथा. काय एकेक वेडे चाळे सांगू. एक कॉफी उकळली, भाताचा पर्वत, साराचा समुद्र आमच्यासमोर आदळला की बाई सुटली मोकाट चहाड्या करायला. हिंदुस्थानी संगीताची दर्दी मी, पण माझी मुलं थाडथाड मांड्या बडवीत कर्नाटकी संगीत की हो गातात. साधं मराठीदेखील हिला बोलता येत नाही वरं." आता मात्र मी पिसाळले आणि म्हणाले, "कानडी मराठीची अम्मा. मराठी दरिद्री. महाराष्ट्र दरिद्री."

"म्हण म्हण तू महाराष्ट्राला दरिद्री." हे किंचाळले. "पण एक दिवस असा उगवेल की बेळगाव-कारवार महाराष्ट्रात सामील होतीलच होतील. मग बसा तुम्ही पुळचट कानडी लोक हात चोळत."

"यारू (कोण) पुळचट? तुम्ही मराठी जना झगडेबाज. माझा थयथयाट सुरू झाला. "पण आम्ही कानडी जना कमी इल्ला. याद इडा (ठेवा). कारवार-बेळगाव कदापि साल्य इल्ला. रक्तपात आगुत्ते. रक्तपात होईल......"

परंतु पुढचं माझं वक्तव्य ऐकायला कुणी टिकलंच नाही. तिघेही पसार झाले. बाळकोमुलाला घेऊन भाऊ स्टेशनवर चालता झाला व त्यांना निरोप द्यायला हेही गेले. जाईनात का? गेले तर गेले. कर्नाटकाची ही शूर कित्तुर चन्नम्मा अशी थोडीच कुणाला डरणार आहे? कारण काही झालं तरी अस्सल मराठी रक्त तिच्या नसांनसातून सळसळतय ना!

• • •










...या रिकाम्या बाटलीत काय दिसतंय ? मंडळींच्या, मूर्खपणाची मिरास ...: संशयाचं भयंकर व्यसन ... जहांबाज, बायकांचे वटारलेले डोळे ... बेजबाबदार बायकांची, बदसूर बडबड ...

**पात्रे : नाना नवरे ● सौ. मंडळी (नानाची) ● बाई (अनोळखी) ● नारुकाका नवरे**

**[ स्थळ : दोन खोल्यांचा ब्लॉक .... डाव्या बाजूस आत जाण्याचे दार. उजव्या बाजूस बाहेरचे. समोर भिंतीला लागून कॉट. खोली बरेच दिवस झाडली नाही. सर्व वस्तू अस्ताव्यस्त. सौ. मंडळी झाडत असून नाना नवरे काठीला झाडू बांधून उगीचच नाचवीत आहे. सौ. मंडळींचं झाडू-बरोबर तोंड चालू आहे. ]**

**सौ :** काय मेलं चार दिवस माहेरी गेले नाही तर घराचा उकिरडा करून ठेवलाय. मेला आळस तरी किती असावा माणसाच्या अंगात. सगळ्याच कामात आळस. उत्साह कसा तो नाहीच. चार दिवसांचं हे. महिनाभर गेले तर शेजारी खोलीला कचरापेटी समजून कचरा टाकायलासुद्धा कमी करणार नाहीत. (नानांवर काहीच परिणाम नाही) ऐवढं वडवडतेय पण आहे का काही त्याचं. मघापासून नुसता धेंडा नाचविल्यासारखं चाललंय.

**नाना :** झालं का तुझं ?

**सौ :** अख्खा दिवस तरी पुरेल का ही घाण काढायला. स्वतः काही करायला नको आणि वर ही मुकादमी. म्हणे झालं का ?

**नाना :** तुझं काम चालू दे ग महिनाभर. तुझं बोलून झालं का एवढंच मला विचारायचं होतं.

**सौ :** माझं बोलणंच तेवढं दिसणार तुम्हाला, झाडणं दिसत नाही.

**नाना :** ते दिसतय ग ! पण मघापासून मला एक शब्द बोलू देशील तर शपथ. नवऱ्यालासुद्धा कचरा समजून तू झाडून काढतेयस. आता फक्त कचरापेटीत फेकायचं तेवढं बाकी राहिलय.

**सौ :** कचरापेटीची काही गरज नाही. चार दिवस कचऱ्यातच लोळताय. झोपायची गादीसुद्धा झाडली नाहीत.

**नाना :** हे फार म्हणजे फार झालं हं ! कचऱ्यात लोळायला मी का हा आहे.

**सौ :** नाही मीच ही आहे. पण काय हो खोली जरा स्वच्छ ठेवली असतीत तर काय बिघडलं असतं.

**ह. शि. खरात**

**नाना :** अग पण मला वेळ कुठाय ! तुला वाटतं मी असा गबाळा राहीन ?

**सौ :** रहाल वर रहाल. चांगला अनुभव आहे मला. घरातलं तेवढं काम नको.

**नाना :** (झाडू नाचवीत) मग हे काय करतोय बाईसाहेब !

**सौ :** मेला बायकांचा जन्म म्हणून रावतेय मी. कधी माझी दया आलीय तुम्हाला. काडीची म्हणून मदत नाही.

**नाना :** मग रोज पहाटे उठून पाणी कोण भरतं – मय्याचं दूध कोण घेतं – चहा कोण करतं – भाजी कोण खुडतं – तुझ्या पातळाला इस्त्री कोण करतं – तुझी आई !

**सौ :** हे बघा, माझ्या आईचं नाव घ्यायची काही गरज नाही. ही काय मेली मदत झाली – आणि एकदा पातळाला इस्त्री केलीत पण शंभरवेळा काढलंत.

**नाना :** म्हणजे मी काहीच करीत नाही का ?

**सौ :** करीत असता तर चार दिवसात असा उकिरडा झाला नसता. शेजारी-पाजारी नावं ठेवतात याचं काहीच नाही.

**नाना :** येथे शेजाऱ्यांचा काय संबंध ?

स्वतःच्या घरातील घाण काढण्यापेक्षा दुसऱ्यांच्या घरातील स्वच्छतेची उठाठेव करण्याचा ह्यांना काय नैतिक अधिकार ?

**सौ :** अहो पण एवढं बोलून घेण्यापेक्षा आपण आपलं घर स्वच्छ ठेवलं तर काय बिघडलं

**नाना :** मी नको म्हणतोय का ? पण हल्लीमातून आलं की काही करूसंच वाटत नाही. आणि खरं सांगू – अशी जवळ येना– खरं कारण वेगळंच आहे.

**सौ** माहीत आहे मला. मुलखाचे आळशी –

**नाना :** मला जरा बोलू देशील का. मघापासून सांगण्याचा प्रयत्न करतोय, पण ह्या झाडूसारखीच जीभसुद्धा अशी फिरवतेस की माझे शब्द कचऱ्यासारखे उडून जातात.

**सौ** माझी जीभ म्हणजे झाडू काय ?

**नाना :** खरं सांगू का, तू गेल्यापासून आपल्याला बुवा चैनच पडत नव्हतं.

**सौ. :** मी काही तुम्हाला सोडून गेले नव्हते.

**नाना :** अग खरंच, काही सुचतच नव्हतं – कशातच मन रमत नव्हतं. झाडू हातात घेतला की तुझ्या केसांची आठवण यायची.-

**सौ** कळतात बरं मला ही बोलणी. पण आता फसायची नाही मी.

**नाना :** नाही, माझ्या शब्दांवर तुझा विश्वासच बसणार नाही. आम्ही आपलं तुझ्यावर प्रेम करावं, आणि तू मात्र –

**सौ** एवढं माझ्यावर प्रेम असतं तर चार दिवसात एखादं पत्र तरी. आणि आज मी येणार म्हणून बरेच स्टेशनवर घ्यायला आलात की !

**नाना :** गैरसमज करू नकोस. तुझ्या स्वागतासाठी मी जातीनं स्टेशनवर हजर होतो. पण घोटाळा झाला.

**सौ :** जेव्हा तेव्हा घोटाळा. लग्नानंतर शंभर वेळा घोटाळा केला असाल तुम्ही.

**नाना :** लग्न हाच मोठा ब्रह्मघोटाळा करून बसलोय. पण ते जाऊ दे. त्याचं काय झालं मी स्टेशनवर –

**सौ :** काही ऐकायचं नाही मला. खोटं बोलून डोळ्यात धूळ फेकू नका माझ्या.

**नाना :** मघापासून तूच डोळ्यात धूळ उडवते आहेस.

**सौ** मग डोळे मिटून घ्या.

**नाना :** डोळे मिटून मला बोलता येत नाही.

**सौ :** पण मला काहीही ऐकायचं नाही. तुम्ही मुळीच स्टेशनावर आला नव्हता.

**नाना :** हे बघ मी बोरीबंदरचे सगळे प्लॅटफॉर्म पालथे घातले पण तुझा पत्ता नाही.

**सौ** अहो पण बोरीबंदरला यायला तुम्हाला सांगितलं होतं कुणी ?

**नाना :** मला इतका बावळट समजू नकोस. पुण्याची गाडी बॉम्बे सेंट्रलला येत नाही बाईसाहेब !

**सौ** कमाल झाली ! अहो पण मी पुण्याला गेले नव्हते.

**नाना :** ते मला माहीत नाही. तू फक्त माहेराला जातेस एवढंच मला माहीत आहे.

**सौ** बाई, बाई, माहेराला म्हणजे पुण्याला असा अर्थ होतो का ?

**नाना :** कुणास ठाऊक ? पण हल्ली बहुतेक बायकांची माहेरं पुण्यालाच असतात.

**सौ** कमाल केलीत अगदी. गेल्याच महिन्यात बाबांची बदली बडोद्याला झाली नाही का ?

**नाना :** अग खरंच की – हे मी विसरलोच होतो !

**सौ** नशीब मला विसरला नाहीत अजून.

**नाना :** त्याशिवाय का स्टेशनवर आलो मी. पोलिस स्टेशनवर चौकशी देखील केली.

**सौ** नशीब, बायको हरविल्याची जाहिरात दिली नाहीत वर्तमानपत्रात.

**नाना :** तेच करणार होतो ; पण म्हटलं आधी वर्तमानपत्र बघावं.

**सौ :** मी आल्याचा फोटो छापून येणार होता का त्यात ?

**नाना :** फोटो नाही ग, पण 'सापडली आहे ओळख पटवून घेऊन जावी' अशी एखादी बातमी बघावी म्हटलं.

**सौ :** चावटपणा पुरे झाला. एक वस्तू तरी ठेवल्या जागी आहे का ? आणि टेबलाखालची रद्दी काय झाली ?

**नाना :** विकून टाकली. चांगला दीड रुपया आला.

**सौ** दीड रुपयाच ? चांगली तीन रुपयाची रद्दी. साधा व्यवहार नाही. तरी जाताना सांगितलं होतं की मी येईपर्यंत कशाला हात लावू नका.

**नाना :** एवढी रद्दी मोडल्यास तुझ्या शब्दाबाहेर नाही.

**सौ** (कॉटखाली झाडू मारताना, एक मोठी बाटली कॉटखालून घरंगळत येते) शी : ! ही बाटली कशाची ?

**नाना :** अग कशाची तरी असणार. तेलाची नाही तर विलाची.

**सौ** चेष्टा नकोय. मी सीरियसली विचारतेय. ही बाटली कशाची अन् ती इथे कशी आली ?

**नाना** ती कशी आली मला माहीत नाही. औषधाची नाहीतर दुधाची असणार. बहुतेक दुधाचीच दिसतेय.

**सौ :** मी काही बाटलीनं दूध पीत नाही म्हटलं.

**नाना :** अग पण हल्ली बाटलीशिवाय दूध मिळतं का ?

**सौ :** बाटल्या-बाटल्यांतला फरक चांगला कळतो मला. ही बाटली दुधाची नाही.

**नाना :** मग घासलेटची असेल.

**सौ :** घासलेटची तर मुळीच नाही. आपण घासलेटसाठी डबा वापरतो. बाटली नाही. ही बाटली आपल्या घरातली मुळीच नाही.

**नाना :** कशावरून म्हणतेस तू ?

**सौ** जाताना मी सगळ्या बाटल्या मोजून गेले होते. आपल्या घरात असली बाटली नव्हतीच. एक आहे पण ती हिरवी, पांढरी नाही.

**नाना :** कदाचित् रंग बदलला असेल.

**सौ** बाष्कळपणा पुरे. सांगा, आधी ही बाटली कशाची.








**नाना** हे बघ, माझा तेलाच्या, दुधाच्या आणि औषधाच्या बाटलीशिवाय दुसऱ्या कसल्या बाटलीशी संबंध आला नाही. निदान अजून तरी. तेव्हा ही बाटली जिऱ्याची की मोहरीची हे तूच जाणे !

**सौ** जिरी-मोहरीच्या बाटल्या मी ओळखते बरं. इतकं नको काही हिणवायला. ही बाटली जिरी-मोहरीची नाही.

**नाना :** मग ती नक्कीच अत्तराची असणार.

**सौ :** अत्तरासाठी एवढी मोठी बाटली वापरायला आपण काही राजे लागून गेलो नाही.

**नाना :** हे बघ, पूर्वी राजे लोकांच्याकडे अत्तराचे हौद असत, मग कारकुनाजवळ एवढी बाटली कां असू नये. या दिवाळीला मी तुला चांगलं अत्तर आणणार आहे.

**सौ :** मला अत्तर नको, उत्तर पाहिजे. ही बाटली कशाची ?

**नाना :** हां. हां ! आता आठवलं. अग परवा आपण फ्रेंच पॉलिश आणलं नाही का ? तीच ही बाटली.

**सौ** मुळीच नाही. तिचा रंग हिरवा आहे. त्यात मी फिनेल भरून ठेवलंय.

**नाना :** (वैतागून) फ्रेंच पॉलिशची नाही तर मग नेल पॉलिशची असेल.

**सौ :** इश्श् ! नेल पॉलीशची बाटली हातभर लांब असते काय.

**नाना :** अग नखं असतात हातभर लांब. मग बाटलीच तेवढी कां असू नये. आणि हल्ली कशाची बाटली केवढी असेल त्याचा नेम नाही.

**सौ :** कमालच करता तुम्ही. एवढी बाटलीभरून नेल पॉलिश कोण घेणार ?

**नाना :** हल्ली बायकांना वस्त्र सोडून, थोडसं असं काहीच पुरत नाही. काहीजणी नेल पॉलिश नखानाच काय पण ओठांना-देखिल लावतील.

**सौ :** नखांना नि ओठांना लावायच्या बाटल्या दुसऱ्या असतात. आधी सांगा बघू ही बाटली कशाची . . ?

**नाना :** तुम्ही बायका म्हणजे भलत्याच ह्या. तुमचं समाधान कसं करायचं हे ब्रम्हदेवाच्या बापालासुद्धा जमणार नाही.

**सौ :** विषयांतर नको. अत्तराच्या कुपी-पासून ॲसिडच्या शिशापर्यंत साऱ्या बाटल्या ओळखते मी.

**नाना :** मग ही बाटलीच तेवढी अपवाद कां बरं ?

**सौ :** मला तुमच्याच तोंडून ऐकायचंय. सांगा ही बाटली कशाची ?

**नाना :** तुझं आपलं एकच. हे बघ, ही बाटली कशाची अन् ती इथं कशी आली, हे मला बिलकूल माहीत नाही.

**सौ :** खोटं ! ही बाटली तुम्ही आणली नाहीत मग काय आभाळातून पडली.

**नाना :** तुला काय म्हणायचंय, ह्या बाटलीला मी जन्म दिला.

**सौ :** इश्श् ! चावटपणा पुरे.

**नाना :** चावटपणा नाही. मी उघड्या डोळ्यांनी पाहिलंय.

**सौ :** काय ?

**नाना :** सांगतोच तुला. परवा बसमध्ये एक गरोदर बाई असा चेहरा करून बसली होती की जणू आता प्रसूत होईल. इतक्यात पोलिस आला अन् तिची झडती घ्यायला लागला बेटा.

**सौ :** इश्श् ! मेल्याला लाजसुद्धा वाटली नाही.

**नाना :** आधी मी सुद्धा भडकलो; पण शेवटी चमत्कार झाला.

**सौ :** चमत्कार ! म्हणजे काय झालं

**नाना** आश्चर्यच करशील, अग झडतीत त्याला तीन बाटल्या मिळाल्या. बघतोय तर बाईचं पोट सपाट.

**सौ :** अय्या ! कमालच झाली.

**नाना :** अग हवालदाराचं कर्तृत्व ते. जाताना बेटा मला म्हणतोय कसा, साहेब उगीच रागवलात, आता हे तिळं झालं त्याचं काय ?

**सौ :** विनोदीच होता मेला !

**नाना :** सारांश, सध्या कोण कुणाला जन्म देईल त्याचा नेम नाही.

**सौ :** बरं चेष्टा आणि विषयांतर पुरे. आधी सांगा, ही बाटली कशाची ?

**नाना :** (कपाळावर हात मारीत) हे कळल्याशिवाय तुझं चालणार नाही का ?

**सौ :** नाही.

**नाना :** (वैतागून) बाटली वाट्टेल त्याची असेल. तुला तिच्याशी काय करायचंय ?

**सौ :** म्हणजे तुम्ही मला सांगणार नाही तर.

**नाना :** नाही. तू मला विचारणारी कोण ? मी वाट्टेल ती बाटली आणीन.

**सौ :** (हुंदके देत) तुमचं माझ्यावर मुळी प्रेमच नाही.

**नाना :** अग पण प्रेमाचा ह्या बाटलीशी काय संबंध ?

**सौ :** (रडत) बाटलीशी नसला तरी तुमच्याशी आहे. तुम्ही असे निघाल असं वाटलं नव्हतं मला. मला फसवलंत तुम्ही.

**नाना :** अग पण तुला असं एकाएकी रडायला काय झालं. वैतागून म्हणालो मी तसं. ही बाटली कशाची आहे, हे मला खरंच माहीत नाही.

**सौ :** खोटं ! नुसती सारवासारव ! सांगा, कां असे वागलात तुम्ही. तुम्हाला

कसलं दुःख आहे (नाना खलास होतो). कां निराश झालात? माझ्यापासून सुख नाही का तुम्हाला? मला सांगायचं नाही का?

**नाना :** तू काय वडबडते आहेस? हे बघ मी काहीच केलं नाही, आणि केलं असतं तर अशा गोष्टी कोणी सांगून करणार वाटतं?

**सौ :** (गळा काढीत) मग तुम्ही या मार्गाला कां लागलात?

**नाना :** (वैतागून) कसला मार्ग! कसलं दुःख! तुला खुळवीळ तर लागलं नाही ना!

**सौ :** तुमच्या मनात नव्हतं तर माझं माहेराला जाणं झालं नसतं – आणि अशी डोक्यात राख घालून घेणं सुद्धा झालं नसतं.

**नाना :** आता खरोखरच डोक्यात राख घालायची वेळ आलीय. हे बघ तू जरा स्वस्थ बस. नाहीतर झोप घे. मी झाडतो खोली.

**सौ :** आता कसली आलीय झोप ! मेलं माझंच चुकलं मी माहेरला जायलाच नको होतं. तुम्ही असं काही कराल असं स्वप्नातदेखिल वाटलं नव्हतं.

**नाना :** अग पण मी काय केलं ते तरी सांग आधी.

**सौ :** आता काय करायचं बाकी राहिलंय.

**नाना :** एवढं कसलं भयंकर पाप माझ्या हातून घडलंय.

**सौ :** (गळा काढीत) कधीपासून घ्यायची घाली गडे!

**नाना :** घेतो? अग घेतो म्हणजे काय? अशी घेतल्यासारखी काय वरळतेस.

**सौ** चोराच्या उलटचा – मलाच म्हणतात, घेतल्यासारखी वरळतेय. असे धंदे करायचे होते तर लग्न कशाला केलंत.

**नाना :** कसले धंदे? माझं ऐकून घेशील की नाही आधी.

**सौ :** काही ऐकायचं नाही. काय वाट्टेल ते खा अन् काय वाट्टेल ते प्या. साऱ्या घरांची राख करा. (झाडू भिरकावून देते.)

**नाना :** म्हणजे?

**सौ :** यापुढे तुमचा माझा संबंध तुटला.

**नाना :** अग लग्नाची गाठ म्हणजे रिबिनची गाठ वाटली काय तुला. म्हणे संबंध तुटला. गैरसमज करून घेऊ नकोस. पश्चात्ताप होईल.

**सौ :** पश्चात्ताप परवडला पण हा ताप नको. खुशाल आयुष्यभर पीत बसा. जाते मी. (निघून जाते).

(नाना हातात खाली पडलेली रिकामी बाटली घेऊन तिच्याकडे बराच वेळ पहात बसतो. नंतर एकाएकी झिंगू लागतो व चढल्याचा अभिनय करतो).

**नाना :** गेली! ती गेली! माझी प्रेमाची पाणपोई गेली. पीत बसा – हो आयुष्यभर पीत बसू. पण ही सक्ती कां? – आम्ही पिणार – न भिता – चोरून कशापायी – हे बघा – तुम्हाला म्हणून सांगतो, – माणसानं करायच्या गोष्टी केल्या पाहिजेत, बोलायच्या गोष्टी बोलल्या पाहिजेत – खायच्या गोष्टी खाल्ल्या पाहिजेत – प्यायच्या गोष्टीं प्यायल्या पाहिजेत पण आम्हांला ते जमत नाही – कोण म्हणतं – साला लगावून देन. आम्हांला सगळं जमतं पण जमवून घेता येत नाही. घ्या ना घ्या. लाजू नका. लाजता काय गडे. मी तुम्हांला नाव घ्यायला सांगत नाही, घ्यायला सांगतोय. काही माणसांना न पिताच चढते. आपल्याला तर बायको जवळ नसली म्हणजे घेतल्यासारखीच वाटते. कारण बायकोच्या तोंडाला लागता येत नाही पण हिच्या न बोलता लागता येते. म्हणतात ते काही खोटं नाही – बायकोपेक्षा बाटली बरी. – (एवढ्यात दार वाजते. दारात एक अनोळखी तरुण बाई उभी राहून हाका मारते).

**बाई :** नवरे आहेत का घरात!

**नाना :** (दचकतो. थोडी उतरल्याचा अभिनय). कां? कां आलीस परत. जाना. तुला मी नकोय. माहेर पाहिजे. जा मग, परत येऊ नकोस. बोल कां परत आलीस?

**बाई :** (दारातूनच) नवरे इथंच राहतात ना! घरात आहे का कुणी?

**नाना :** (आणखी उतरल्याचा अभिनय) आं. कोण आहे! कोण पाहिजे. आहे ना मी घरात. याना आत या.

**बाई :** (दारातून आत येते) आपणच नवरे ना?

**नाना :** होय मीच नवरे! आपण कोण!

**बाई :** अय्या, मला ओळखलं नाहीत तुम्ही.

**नाना :** खरं म्हणजे मी तुम्हाला प्रथमच पाहतोय.

**बाई :** कमाल आहे. म्हणजे बाबांचं पत्र

**यंदाच्या काही (चुकून) राहिलेल्या बदल्या!**




'छद्मभूषण'

अनुक्रमणिका

मिळालं नाही वाटतं ?

**नाना :** बाबांचं ! कुणाच्या ?

**बाई :** इश्श् ! पुण्याचे बाबासाहेब सदासुखी तुमचे स्नेही आहेत ना, त्यांचीच मी मुलगी.

**नाना :** पुण्याचे सदासुखी ? माझे स्नेही?

**बाई :** असं काय बघताय वेड्यासारखे. तुमची तब्येत ठीक आहे ना ?

**नाना :** अं, हो. सकाळपासून जरा डोकं चढल्यासारखं झालंय. तरीपण पत्र मिळाल्याचं आठवत नाही बुवा.

**बाई :** पुण्याहून मीच पत्र टाकलं होतं पोस्टात. बाबांनी हाच पत्ता दिलाय. हे बघा (पत्ता दाखवते). श्री. नवरे खो. नं. ५ बाटलीवाला चाळ, गिरगाव, मुंबई ४.

**नाना :** हल्ली पोस्टाचं काही विचारू नका. अहो बेळगावचं पत्र बेलजमला जातं तर बॉम्बेचं शोम्बेलासुद्धा जाईल (दोघेही विनाकारण हसतात).

**बाई :** कमालच झाली पत्राची.

**नाना :** आपण अशा उभ्या कां ? बसा ना, इथं बसा. (ती व नाना कॉटवर बसतात) अरे, पण आपलं नाव सांगितलं नाहीत अजून.

**बाई :** (लाजत) माझं नाव सुनंदा सदासुखी.

**नाना :** वा! नाव तर फारच सुंदर आहे. तुमच्या आगमनाचं कारण कळलं नाही. खरं म्हणजे पत्र मिळालं असतं तर हा प्रश्न अप्रस्तुत ठरला असता.

**बाई :** मी किनई, पुण्याहून इंटरव्ह्यूसाठी आलेय.

**नाना :** इंटरव्ह्यूसाठी ? कसल्या ?

**बाई :** अहो मी इथल्या बाटलीबॉय अॅण्ड कंपनीत नोकरीसाठी अर्ज केला होता.

**नाना :** कोणत्या कंपनीत ?

**बाई :** बाटलीबॉय आणि कंपनी. एवढं आश्चर्य वाटायला काय झालं.

**नाना :** काही नाही. नाव जरा ओळखीचं वाटलं

**बाई :** तिथूनच इंटरव्ह्यूसाठी कॉल दिलाय मला. मुंबईत दुसरी सोय नाही, म्हणून बाबांनी तुमचा पत्ता दिला.

**नाना :** आणि मला मात्र त्याचा काहीच पत्ता नाही. काही हरकत नाही.

**बाई :** (चौफेर बघत) आज 'स्वच्छता सप्ताह' आहे वाटतं.

**नाना :** आँ ! (हसत) सॉरी हं ! तुम्हाला धुळीत बसावं लागलं. त्याचं काय आहे, मला स्वच्छतेची भारी आवड. खोली कशी टिप-टॉप पाहिजे. गादीवरील घडी सुद्धा खपत नाही मला.

**बाई :** आमचे बाबासुद्धा खोली कशी आरशासारखी स्वच्छ ठेवतात.

**नाना :** शेवटी बाबाच ना ! अहो मी तर आठवड्यातून निदान कमीतकमी सात वेळा झाडतो. करणार काय आमच्या मंडळी म्हणजे मूर्तिमंत आळस.

**बाई :** अय्या, मी साफ विसरलेच होते. वहिनी दिसत नाहीत वाटतं घरात.

**नाना :** आताच गेली ती. जरा माहेरी जाऊन येते म्हणाली. बरं ते जाऊ द्या. बोला काय घेणार ?

**बाई :** म्हणजे !

**नाना :** म्हणजे चहा, कॉफी की काही थंड चालेल ?

**बाई :** मला काहीही चालेल. पण सध्या काहीच नको. वहिनी असत्या म्हणजे गोष्ट वेगळी –

**नाना :** वहिनी ! म्हणजे मंडळी. अहो ती असती तरी मलाच चहा करावा लागला असता.

**बाई :** तसं नव्हे पण –

**नाना :** अहो आमची मंडळी म्हणजे – (इतक्यात बाहेरून सौ. मंडळींचा आवाज येतो. नानांची गाळण उडते).

बाहेरचा आवाज : परत नाही आले काकू – अहो माहेरची बॅगच विसरले मी. त्यात साड्या आहेत ना.

**नाना :** अरे बापरे ! ठार मेलो ! सदासुखी, सदासुखी मला वाचवा !

**बाई :** अय्या ! कमालच झाली. अचानक असं काय झालं तुम्हाला.

**नाना :** ते तुम्हांला नंतर सांगेन. या क्षणाला आधी लपा कुठेतरी. पाया पडतो. प्लीज ! 

**बाई :** अहो पण लपायचं कां नि कुठे ?

**नाना :** ते मग सांगेन म्हणतो ना. आधी ह्या कॉटखाली लपा. उशीर नको. एकेक क्षण मोलाचा आहे.

(तिला कॉटखाली लपवतो व आपण झाडू घेऊन कॉटभोवती घुटमळतो सौ मंडळी प्रवेश करतात.)

**सौ.** मेलं जायची घाई करावी नि काही तरी विसरतंच. जिथं क्षणभरसुद्धा राहू नये तिथं पुन्हा तोंड दाखवायची पाळी येते.

**नाना :** मला वाटलंच होतं तू पश्चात्ताप पावून परत येणार.

**सौ. :** मी तुमच्याशी बोलत नव्हते.

**नाना :** पण मी बोलतोय ना.

**सौ. :** तुमच्याशी हुज्जत घालायला वेळ नाही. मला माझी माहेरची बॅग द्या. त्यासाठी परत आलेय मी.

**नाना :** म्हणजे ?

**सौ. :** म्हणजे मी शरणागती पत्करून परत पुन्हा राह्यला आले नाही !

**नाना :** (कॉटकडे बघत) सध्या तुझी शरणागती नकोय मला. तुला जायचं असेल तर खुशाल जा.

**सौ. :** तुमचा सल्ला घ्यायला आले नाही मी. माहेरची बॅग द्या माझी.

**नाना :** बॅगेचं निमित्त नको. तुझं माझं जमणार नाही – (कॉटकडे बघत) सध्यातरी. घेऊन जा तुझी बॅग.

**सौ. :** बाजूला व्हा मग. ती कॉटखाली आहे.

**नाना :** (चमकून) ती कॉटखाली आहे ? कोण ?

**सौ.** माहेराची बॅग !

**नाना :** तुझी बॅग कॉटखाली ! अरे बापरे !

**सौ. :** कां ? एवढं घाबरायला काय झालं ?

**नाना :** (सावरून) तसं अजून काही झालं नाही. अन् घाबरतंय कोण ? पण . . . पण खरंच तू माहेराला जाणार.

**सौ. :** अजून खरं वाटत नाही. इतकी वेळ मी काय नाटक करतेय.










**नाना** : तसं नव्हे ग. तू माहेराला जाणार म्हणजे प्रवास आलाच. तेव्हा बॅगचं ओझं कशाला बरोबर.

**सौ.** : बॅगचं ओझं तुमच्या डोक्यावर देणार नाही म्हटलं!

**नाना** : अग पण कमी सामानात प्रवास सुखी होतो हा साधा नियमसुद्धा तुला माहीत नाही?

**सौ.** : सुखी प्रवासाचे नियम शिकायला आले नाही मी. मुकाट्यानं बॅग घेऊ द्या.

**नाना** : म्हणजे खरोखरच तुला बॅग पाहिजे.

**सौ.** : बॅगेत एवढा कसला जीव अडक-लाय. तीत काही वाटल्या नाहीत.

**नाना** : बॅगमध्ये नाही ग जीव अडकला. हे बघ, तू विनाकारण गैरसमज करून घतलायस.

**सौ.** तेच तेच ऐकायचा मला कंटाळा आलाय.

**नाना** : एवढ्या तेवढ्यावरून डोक्यात राख घालून तू मला एकट्याला टाकून जाणार?

**सौ.** : का तुमची वाटली आहे की सोवतीला तुमच्या.

**नाना** : हे बघ पुन्हा वाटलीचं नाव काढशील तर तिचे फोडून तुकडे करीन.

**सौ.** ह्या नाटकी प्रतिज्ञा बस् झाल्या. आधी मला माहेराची बॅग द्या.

**नाना** : (तिला आत कटविण्याच्या उद्देश्याने) हे बघ झालं गेलं विसरून जा बघू. मला तुझ्याशिवाय चैन पडणार नाही. आधी आत जावून मस्त पैकी चहा कर बघू.

**सौ.** (वैतागून) चहा प्या नाहीतर वाटेल ते प्या. माणसानं सहन तरी किती करायचं. आज कॉटखाली बाटली सापडली उद्या बाई सापडेल –

**नाना** : आं! (घाबरून) अग-अग असं काहीतरी बोलू नकोस. आधी तू आत जा बघू. तोंवर मी बॅग काढतो.

**सौ.** : मला हात आहेत म्हटलं. आधी मुकाट्यानं बाजूला व्हा.

**नाना** : हे बघ तू माहेरचं कॅन्सल कर-शील अन् थोडी आत जाशील तर एकच काय पण असल्या छपन्न बॅगा घेऊन देईन.

**सौ.** : मला माझी माहेरचीच बॅग पाहिजे.

**नाना** : माहेराच्या बॅगला काय सोनं लागलंय.

**सौ.** ते तुम्हा पुरुषांना माहेर असतं म्हणजे कळलं असतं.

**नाना** : हे बघ, तू माहेराला जाणार नाहीस, असं वचन देशील तर तुला बॅग देतो.

**सौ.** : वा! वा! म्हणजे संन्यास घेणार असशील तर मुलगी देतो असं म्हणण्या-सारखंच आहे हे.

**नाना** : ते काहीही असो. आधी मला वचन दे.

**सौ.** वचन-बिचन काही नाही. आधी माहेराची बॅग.

**नाना** : आधी वचन, मग बॅग.

**सौ.** (गळा काढीत) मेलं जेव्हा तेव्हा नुसता छळवाद. त्यापेक्षा जीव दिलेला परवडला. साधी बॅगपण स्वार्थ सुटत नाही.

**नाना** : (वैतागून) घे, घे, एकदाची तुझी माहेराची बॅग. होऊ दे तुझा तळीराम गार.

(सौ. मंडळी खाली वाकून बॅगच्या ऐवजी कॉटखालून सुनंदा सदासुखीला बाहेर ओढून काढतात – व किंचाळतात. नाना खलास झाला आहे).

**सौ.** : (खरा प्रकार कळून आला आहे) हं!

**नाना** : (सावरण्याचा प्रयत्न) अरेच्चा! ह्यांची ओळख करून द्यायला विसरलोच मी. ह्या तुझ्या बॅगच्या घाईत लक्षातच आलं नाही. माझ्या – ह्यांची ओळख –

**सौ.** : काही गरज नाही. सारं ओळखलं आहे मी.

**नाना** : पण मी काही न सांगताच.

**सौ.** : हो. तुम्ही काही न सांगताच. काही गोष्टींची ओळख न सांगताच होते.

**नाना** : अग पण त्या काही गोष्टीत ह्या बसत नाहीत.

**सौ.** : पण ह्या गोष्टी बसतात ना!

**नाना** : कोणत्या?



## एक आहे पोलकं

एक आहे पोलकं ऽ
आकारानं ढोलकं ऽ
पोर-पणी होतं म्हणे
फार फार बोलकं
आताशा हालतात नुसतीच लोलकं ऽ
जेव्हां पासुन आड
चोळी आली द्वाड
पोलक्याचं गेलं ऽ माझे कवाड
कोणी येत नाही
दार ठकलीत नाही
पोलक्यास वरच्या पेक्षा ताण खाली राही
ऑफिसात जातं
घामाघूम होतं
फार झालं म्हणजे कमाल मात घेतं
वर्षानुवर्षं
तोच तोच स्पर्श
वाढत्या मेदाशी वाढता संघर्ष
गपचीप जगतं
अचानक बियरतं
एखाद्या विवशी गल्बलून हसतं
हळदीच्या अतप्त इच्छेन विरतं

–फाशाक्ता

**सौ.** : तुम्ही मला पत्र कां टाकलं नाहीत. – स्टेशनवर न्यायला कां आला नाहीत – खोलीचा उकिरडा कां झाला – आणि ही वाटली कशाची अन् इथं कशी आली – ह्या साऱ्या प्रश्नांचं उत्तर एकच.

**नाना** : कोणतं?

**सौ.** गळेकापू – धोकेबाज – विश्वास घातकी – कसाई –

**नाना** हे बघ, तू आधी खरा प्रकार जाणून घे. ह्या बाई किनई –

**सौ.** : (गळा काढीत) माझं मेलीचं नशीबच फुटकं. असं विश्वासघात करून तुम्हांला काय मिळालं?









अनुक्रमणिका

**नाना** : मी कसलाच घात केला नाही, अन् मला अजून काहीच मिळालं नाही.

**सौ.** : खोटं! मी तुमचा अपराध तरी काय केला होता?

**नाना** : तुझी काहीच चूक नाही. अपराध मीच केला.

**सौ.** : (सुनंदाकडे बोट करून) – म्हणून ही शिक्षा माझ्या कपाळी दिलीत.

**नाना** : अग, कसली कप्पाळाची शिक्षा! तुझ्यापुढं मात्र कपाळाला हात लावायची वेळ आली.

**सौ.** : माझा एकदा कपाळमोक्ष तरी करा म्हणजे तुमचं समाधान होईल.

**बाई** : (बराच वेळ बावरलेली) पण – खरंच वहिनी – तुमचा काहीतरी गैरसमज होतोय. इतका वेळ बोलले नाही पण –

**सौ.** : मला वहिनी म्हणायचं काम नाही. साळसूद कुठली. दुसऱ्याच्या संसारात माती कालवून तुला काय मिळालं?

**नाना** : तू फार म्हणजे फार मोठा घोटाळा करतेयस. अग ह्या बाई माझ्या ओळखीच्या सुद्धा नाहीत. मी ह्यांना प्रथमच पाहतोय.

**सौ.** : अस्सं होय! मग अनोळखी बाईला कॉटखाली कुणी लपवून ठेवतं वाटतं.

**नाना** : हीच माझी चूक झाली, पण ह्यांची माझी काही ओळख नाही.

**सौ.** : आणि काय हो, ओळख नसताना ही तुमच्याकडे आलीच कशी?

**नाना** : मी त्यांना आणलं नाही. त्या स्वतःहून इकडे आल्या.

**सौ.** : मदनाचे पुतळेच लागून गेलात की नाही.

**नाना** : अग ह्या पुण्याहून पाहुण्या म्हणून आल्याहेत आपल्याकडे. पुण्याला आपले कुणीतरी स्नेही आहेत, त्यांची ही मुलगी– त्यांचं नाव –

**बाई** . सुनंदा सदासुखी.

**सौ** . सदासुखीच दिसतेय. तरी बरं माझ्या दूरच्या नात्यातील वहीण म्हणून सांगितलं नाहीत.

**नाना** : अग पण तसं सांगण्याची गरज काय?

**सौ.** : कळतात बरं मला हे डावपेच. आज तुमचं खरं स्वरूप कळून आलं. वरून गरीब गाई पण आतून शुद्ध कसाई.

**नाना** : अग माझे आई जरा माझं ऐकून तरी घे.

**सौ.** : आता मी तुम्हाला आईच वाटणार (गळा काढतात).

**नाना** : च्च्! त्या अर्थानं बोललो नाही मी.

**सौ.** : मग ही बाई इथं आली कशी ते आधी सांगा.

**नाना** : तेच सांगतोय मी. ह्या इंटरव्ह्यू-साठी पुण्याहून आल्यात. त्यांना नोकरीसाठी कॉल आलाय.

**सौ.** : नोकरीसाठी कॉल काय! असं नाटक रचता काय? मग मघाशी कॉट-खाली हिचा इंटरव्ह्यू घेत होता वाटतं.

**नाना** : अग मी इंटरव्ह्यू घेणार नाही, ती बाटलीवाय आणि कंपनी घेणार आहे.

**सौ.** : बाटलीवाय आणि कंपनी. काय मेलं चावट नाव. ही कंपनी सुद्धा तुमचीच असणार.

**नाना** : मी अशा कंपन्या काढल्या असत्या तर आपण बाटलीवाला चाळीत राहिलो असतो का?

**सौ.** : मग हे काय सरकारी हपिसाचं नाव झालं वाटतं.

**नाना** : अग ही सरकारी कंपनी नाही. खाजगी कंपनी आहे.

**सौ.** : अस्सं! ही कंपनी खाजगी आहे तर. ह्यासाठीच खाजगी कंपन्या बऱ्या असं सारखं म्हणत असता तर.

**नाना** : अग खाजगी कंपनीत पगार जास्त मिळतो.

**सौ.** : (सुनंदाकडे बोट करीत) आणि वरती असलं बोनससुद्धा मिळत असेल.

**नाना** : तुझ्यापुढं कसं बोलायचं हेच कळत नाही. सुनंदाताई तुम्ही तरी हिची समजूत काढा.

**सौ.** : माझी समजूत काढायला मी काही कुक्कुलं बाळ नाही म्हटलं.

**बाई** : वहिनी माझ्यावर विश्वास ठेवा. तुम्ही जे ऐकलंत त्यातला शब्द न् शब्द खरा आहे.

**सौ.** : ऐकणं नि पहाणं ह्यात फरक असतो. आणि पुन्हा मला वहिनी म्हणायचं कारण नाही.

**नाना** : म्हणजे तू तेवढी शहाणी आणि आम्ही मूर्ख!

**सौ.** : नाही मीच मूर्ख! म्हणूनच तुमच्याशी लग्न केलं. झाला तेवढा तमाशा पुरे. तुमचा एकसुद्धा शब्द ऐकायचा नाही मला. माझं मेलीचं नशीबच फुटकं. रोज काढा असल्या खाजगी कंपन्या. अन् रोज घाला गोंधळ. ही माझी बॅग. जाते मी. पुन्हा म्हणून मी तुमचं तोंड पाहणार नाही.

(सौ. मंडळी बॅग घेऊन तरातरा बाहेर जातात. नाना व बाई एकमेकांकडे 'आ' वासून बघत राहातात).

**नाना** : (स्वतःशीच) गेली! ती गेली. माझी प्रेमाची पाणपोई गेली.

**बाई** : (भीत भीत) क्षमा करा हं माझ्यामुळेच तुम्हाला हा त्रास झाला.

**नाना** : छे! छे! तुम्ही उगीच असं मनाला लावून घेऊ नका.

**बाई** : पण मी नसते आले तर हे घडलंच नसतं.

**नाना** : हे बघा, घडायचं ते घडणारच. अटळ गोष्टी टाळून टळत नाहीत. हे भोग असतात. ते कुणीतरी भोगलेच पाहिजेत.

**बाई** : पण माझ्यासारखीनं एकटी येण्यात खरोखरच चूक केली.

**नाना** : तुम्ही मुळीच चूक केली नाहीत आणि मी सुद्धा केली नाही. सगळा घोटाळा ह्या बाटलीनं केला.

**बाई** : बाटलीनं? म्हणजे?

**नाना** : त्याचं काय झालं. आधी ह्या बाटलीनं आगीत तेल टाकलं आणि तुम्ही वाऱ्यासारख्या घरात आलात. मग प्रलय होणार नाही तर काय होणार?

**बाई** : पण त्या बिचाऱ्या बाटलीनं काय केलं.

**नाना** : सुनंदाबाई, तुमच्यासारख्या साऱ्याजणी समजूतदार कशा असणार!

हुम वाटलीला वघून आमच्या मंडळीनी पराचा कावळा केला आणि संशयाचा भुसता हलकल्लोळ माजला.

**वाई :** सशुर्य ! कसला संशय ?

**नाना :** तुम्हीच सांगा. ही वाटली पाहून मी पितो असं तुम्हाला वाटतं का ? अहो वाटली कशाची आणि इथं कशी आली हे मला अजिबात ठाऊक नाही.

(यावेळी शेजारचे नारुकाका वाहेरून ओरडत येतात.)

**वाहेरून आवाज :**—नान्या ! अरे नान्या!

**नाना :** अरे वापरे ! शेजारचे नारुकाका ! सुनंदावाई –

**वाई :** हे वघा मी आता कॉटखाली मुळीच लपणार नाही.

(सुनंदा वाजूला उभी राहते).

**नारुकाका :** (प्रवेश करून) नाना अरे काय करतोयस.

**नाना :** या नारुकाका. आज वाजत गाजत आलात !

**नारु :** ओरडू नको तर काय करू ? अरे सकाळपासून आमच्या घरात आग भडकलीय नुसती.

**नाना :** नारुकाका, तुम्ही सुद्धा जखमेवर मीठ चोळता.

**नारु :** चेष्टा नाही. अरे घासलेटच्या वाटलीवरून भडकली आग.

**नाना :** घासलेटच्या वाटलीचा गुणच तो.

**नारु :** साली सापडतच नाही सकाळपासून. म्हटलं तुझ्याकडे वघावी. घासलेट मिळालं नाही म्हणून तसाच तुझ्याकडे आलो होतो काल – विसरली विसरली असणार.

**माना :** काका—काका फार उशीर केलात तुम्ही. फार, फार उशीर केलात. जरा लवकर येता तर—पण आता त्याचा काय उपयोग.

**नारु :** (वाईकडे लक्ष जाऊन—चमकून). अरे नान्या. ह्या कोण ? कुठेतरी पाहिल्यासारख्या वाटतात.

**माना :** ह्या पुण्याहून आल्यात. ह्यांचं नाव –

**वाई :** सुनंदा सदासुखी. पुण्याचे मामासाहेव•सदासुखी यांची मी मुलगी.

**नारु :** वाटलंच मला अग तुझे वावा तर माझे चांगले स्नेही. तू येणार म्हणून पत्र देखिल आलंय पण तू इथं कशी आलीस ?

**वाई :** पत्त्यात खोली नं. ५ आहे. आणि हे सुद्धा म्हणाले मीच नवरे म्हणून.

**नाना :** नारुकाका, तुम्हीच सांगा, नवरे घरात आहेत का असं विचारल्यावर तुम्ही काय उत्तर देणार.

**नारु :** म्हणजे घोटाळा झाला. सुनंदा या चाळीत नवरे आडनावाचे दोन नवरे राहतात. हा नाना नवरे खोली नं. ५ आणि मी नारुकाका नवरे कोपऱ्यातील खोली नं. १५ मध्ये राहतो.

**नाना :** म्हणूनच आम्ही यांना कोपऱ्यातले नवरे म्हणतो. सॉरी हं सुनंदावाई, मी तुम्हाला हे आधी सांगितलं पाहिजे होतं.

**नारु :** काही हरकत नाही. आणखी काही घोटाळा केला नाहीस ना ! वरं झालं मी वेळेवरच आलो.

**नाना :** पण आता त्याचा काय उपयोग ?

**नारु :** कायरे नान्या. वहिनी दिसत नाहीत. कुठं वाहेर गेल्या वाटतं.

**नाना :** वाहेर नाही पण माहेर ह्या ठिकाणी गेल्यात.

**नारु :** थापा मारू नकोस. कालच तर त्या आल्या.

**नाना** काय सांगू काका आता. तुमची ही वाटली आणि ह्या पुण्याच्या वाई घरात पाहून तिनं भलताच संशय घेतला.

**नारु :** आणि डोक्यात राख घालून निघून गेल्या ?

**नाना :** पण नारुकाका माझा काहीच अपराध नाही.

**वाई :** खरंच नारुकाका, त्यांचा काहीच दोष नाही.

**नारु :** सुनंदा तू नकोस सांगू मला. त्याला हा गाढवच जवावदार आहे. नान्या, वायकोशी कसं वागावं हे कळत नाही तर लग्न कशाला केलंस ? अरे एकदा का वायकांचं माथं भडकलं की त्याचं मायेरान होणं फार कठीण. भोग आता त्याची फळं. चल सुनंदा घरी. त्याचं तो वघून घेईल. जो करेगा वो भरेगा –

(सुनंदा व नारुकाका जातात. नाना पुन्हा चढल्यासारखा झिंगू लागतो. आणि वरळू लागतो).

**नाना :** जो करेगा वो भरेगा – हे काय – माझ्या हातात काय ? (वाटली समजून) वाटली ! हीच ती वाटली जिनं माझ्या संसारात अनर्थ केला. छे! छे ! ह्या रिकाम्या वाटलीनं काय केलं तुझं – वघू जरा ह्या रिकाम्या वाटलीत—काय दिसतंय – काय— मंडळीच्या मूर्खपणाची मिरास – संशयाचं भयंकर व्यसन – त्यांना संशयच चढतो. ह्या रिकाम्या वाटलीत काय पहातोय मी— गरीव विचाऱ्या नवऱ्याच्या जहांवाज वायकांनी वटारलेले डोळे. वेजवावदार वायकांची वेदनूर वडवड – वेअक्कल वायकांची वेवंदशाही. म्हणूनच मी म्हणतो की —वावांनो "वायकोपेक्षा वाटली वरी" कारण माणसानं करायच्या गोष्टी केल्या पाहिजेत – वोलायच्या गोष्टी वोलल्या पाहिजेत – खायच्या खाल्ल्या पाहिजेत – आणि ध्यायच्या प्य.यल्या पाहिजेत – हो अगदी आयुष्यभरून !

– प ड दा –

**(लेखकाच्या आगाऊ लेखी परवानगी-शिवाय प्रयोग करू नये)**













...त्याला दरदरून घाम फुटत होता...बघता बघता त्याचे डोळे लालभडक आणि पाणीदार दिसू लागले आणि मोक्षलिंगमचा प्राण क्षणात मोक्षाकडे तर क्षणात भूतलावर झुकत होता...

—यशवंत गोडबोले

दर एक-दोन महिन्यांनी आमच्या घरी काहीतरी नवीन फॅड निघते.

उन्हाळ्याच्या सुट्टीत शिवण्याचे मशीन घेतले आणि सर्व कपडे घरीच शिवण्याचा निर्धार सौ. नं. व्यक्त केला. रुमाल, पिशव्या, परकर वगैरे जिन्नस शिवण्याचे प्रयोग चालू होते तोपर्यंत ठीक होतं. पण सौ. नं माझा नाईट पायजमा शिवला तेव्हा मात्र मी गंभीर झालो. पायजमा धड पायापर्यंत लांब नव्हता किंवा गुडघ्यापर्यंत आखूडही नव्हता. शिवाय कमरेखाली एवढा घट्ट होत होता की मी खाली बसलो तर त्याचं 'विभाजन' अटळ होतं! तरीपण सौ.च्या हट्टासाठी ऑफिसातून घरी आल्यावर मी तो पायजमा घालून खाली न बसताच घरात वावरत असे! पायजम्यातून सुटका करून घेण्याचा माझा एक प्रयत्न अयशस्वी ठरला होता. कल्याणला मेव्हण्याकडे मुंजीला गेल्यावर मी पायजमा मुद्दामच तिथं विसरून आलो आणि सुटकेचा श्वास सोडला. पण तिसऱ्याच दिवशी वेळात वेळ काढून मेव्हणा तत्परतेने पायजमा घेऊन न चुकता आमच्या घरी आला होता! नंतर पायजम्यातून सुटका करून घेण्याची एक नामी संधी मला लाभली. माझा भाचा अमेरिकेला बोटीनं गेला तेव्हा आमच्याकडे उतरला होता. बॅलार्ड-पीयरला जाताना मी तो पायजमा हळूच त्याच्या बॅगेत खुपसून टाकला. आता निदान दोन वर्षे तरी तो भायदेशी परत येणं शक्य नाही.

हळूहळू शिवणाचं फॅड गेलं.

जून-जुलै महिन्यात पावसामळं बाहेरही जाता येत नव्हतं त्यामुळं कॉलनीतल्या एका भगिनीच्या डोक्यात 'भजनी मंडळ' काढण्याची कल्पना आली आणि सर्व भगिनींनी ती उचलून धरली. पेटी-तबल्याची जमवाजमव झाली. माधव-बागेतून टाळ-झांजा आणल्या. दादरहून एक मास्तर भजन शिकवायला येऊ लागले.

दर रविवारी एखाद्या भगिनीच्या घरी 'भजनी-मंडळ' बसू लागलं. रविवारी सकाळपासून कॉलनीतल्या वातावरणात 'सस्पेन्स' असे. आज कुणाकडे भजनीमंडळ बसणार या धास्तीनं अस्वस्थ होऊन पुरुष-मंडळी जेवणानंतर गॅलरीत फेऱ्या मारीत रहात. टाळ घेऊन भगिनी आपल्या क्वॉर्टरवरून पुढे गेल्या की, सुस्कारा सोडून पुरुष झोपण्याच्या तयारीस लागत. थोड्याच अवधीत भजनी-मंडळानं कॉलनीत दहशतीचं वातावरण निर्माण केलं! मोडकांकडे एका रविवारी भजन झालं आणि त्यानंतर आठवडाभर श्रीयुत मोडकांच्या कानात सारखे भजनाचे स्वर आणि टाळ-झांजांचे आवाज घुमत होते म्हणे! रात्रीबेरात्री ते झोपेतून दचकून उठत आणि उभे राहून 'गोविंदा रामा। जयजय गोपाळ-रामा। यादव रामा, जयजय माधवा रामा।' असा गजर करीत! प्रत्येक अभंगा-नंतर किंवा भक्तिगीतानंतर होणारा गजर म्हणजे मोठा कहर असे. प्रत्येकीला वाटे, आपण जितके युनिट आवाज जास्त चढवू तितके ग्रॅम जास्त पुण्य आपल्या पदरात पडेल! शिरा ताणून दोन्ही बाजूच्या बायका दमछाक होईपर्यंत नामाचा गजर करीत. एक वाजल्या-पासून सुरू होणारा हा भजन-सोहळा तब्बल अठरा आरत्या म्हटल्यावर साडेचार वाजता समाप्त होत असे. श्रावण सरला आणि

पावसाबरोबरच भजनाचं वेडही नाहीसं झालं.

सौ. पुन्हा बेकार झाली. आता नंतरचं फॅड कोणतं निघेल या विवंचनेत मी होतो. हा मधला काळ मोठा चमत्कारिक आणि भयप्रद असे.

अखेर एके दिवशी सौ.नं प्रस्तावना केली की, ती आता 'राष्ट्रीय एकात्मता' साधण्याचा अभिनव प्रयोग करणार होती. त्या दिवशीच्या रेडिओवरच्या 'वनिता-मंडळा'त एका सुविद्य महिलेचं भाषण झालं होतं. ती म्हणाली होती –

....अशी ही राष्ट्रीय एकात्मता साधण्यासाठी गृहिणींनी राजकारणातच पडलं पाहिजे असं नाही. जातीयता आणि प्रांतीयता नष्ट करून साऱ्या भारतीयांना एकत्र आणण्याचं कार्य गृहिणींना घरात बसूनही करता येईल. निर्मला गोखलेच्या शेजारी, सरस्वती वेंकटरमण आणि सरलाबेन शहा राहतात. पण निर्मलेनं कधी त्यांच्याकडे जाऊन त्यांचे इडली-डोसा किंवा खमण-उंधियु वगैरे पदार्थ शिकण्याची उत्सुकता दाखवली आहे का? किंवा आपल्या पुरणपोळ्या, अळूवड्या वगैरे तिनं कधी वेन्कटरमणच्या घरी दिल्या आहेत का? या गोष्टी वाटतात क्षुल्लक, पण यातूनच शेवटी मनं जवळ येतात. शेजारी राहणाऱ्या इतर भाषिकांची मनं अशी जिंकली तर तो एक राष्ट्रीय एकात्मता साधण्याचा चांगलाच प्रयत्न ठरेल. भगिनींनो! सेतू बांधताना श्रीरामाला मदत करणाऱ्या छोट्या खारीप्रमाणे तुम्हीही या महान राष्ट्रीय कार्यातला वाटा असाकारे का उचलत नाही?" असा ठरीव ठशाचा प्रश्न करून तिनं भाषण संपविलं होतं.

त्या भाषणाचा सौ.वर फारच तीव्र परिणाम झाला.

दुसऱ्याच दिवशी तिची प्रत्यक्ष कृती सुरू झाली. क्यू-बारा नंबरच्या क्वॉर्टरमध्ये राहणाऱ्या राजलक्ष्मी सेतुमाधवन्‌कडून सौ. इडलीचं प्रमाण आणि कृती शिकून आली. त्या बदल्यात तिनं राज-लक्ष्मीच्या छोट्या चिन्नूसाठी बेसन लाडू करून पाठविले. चिन्नूला आणि त्याच्या वडिलांना ते लाडू इतके आवडले की सौ.नं पुन्हा रवा लाडू आणि बुंदी लाडूही त्यांच्याकडे करून पाठविले! ही असली राष्ट्रीय एकात्मता माझ्या खिशाला परवडणारी नव्हती! पण काही बोललो तर मी अराष्ट्रीय आणि संकुचित मनोवृत्तीचा ठरेन म्हणून मुकाट्यानं चिन्नूची चैन पहात स्वस्थ बसलो.

शनिवारी रात्री सौ.नं इडल्यांचं पीठ भिजत घातलं.

रविवारी सकाळी ती उत्साहानं कामाला लागली. मी बंडूला दोन-चार मित्रांना बोलवायला पाठविलं. सौ.नं स्टोव्हवर कुकर ठेवला आणि त्यात वाट्यांतून इडलीचं पीठ घालून कुकरचं झाकण बंद केलं. आम्ही उत्सुकतेनं तो प्रयोग पाहू लागलो. क्षणाक्षणाला उत्सुकता वाढत होती. राष्ट्रीय एकात्मता साधण्याच्या महान कार्यातला थोडासा वाटा उचलल्याच्या कल्पनेनं आम्हाला समाधान वाटत होतं.

चार पाच मित्रमंडळी आली होती. सौ.नं आत्मविश्वासानं कुकर उघडला. वाट्या बाहेर काढल्या. त्यातलं पीठ जरासं घट्ट झालं होतं पण आतून त्या कच्च्याच असाव्यात. इडलीशी थोडंसं साम्य असलेला तो पदार्थ तिनं प्लेट्समधून वाढला. दोन-दोन इडल्या चटणीसह मी बाहेर मित्रांना नेऊन दिल्या आणि 'सुरवात करा' असं सांगून आत आलो. थोड्या वेळानं, आणखी एकेक इडली घालावी म्हणून बाहेर गेलो तर तिथं चिटपाखरूही नव्हतं! सारे पसार झाले होते. इडलीची थोडी-थोडी चव घेतलेली दिसत होती.

पण या प्रसंगानं सौ. मुळीच नाउमेद झाली नाही. राष्ट्रीय कार्य करताना संकटं यायचीच. त्यांना हसतमुखानं तोंड दिलं पाहिजे असं तिचं मत होतं.

मला मात्र त्या दिवशी तोंड दाबून तीन इडल्या खाव्या लागल्या होत्या. आणखी एक इडली तिनं आग्रहानं वाढली तेव्हा मात्र माझा नाइलाज झाला. तेवढ्यात आमची मनी मांजरी तिथं आली. मी हळूच इडली मनीपुढं सारली. माझा उदारपणा पाहून तिनं साशंकपणे माझ्याकडे पहात त्या इडलीचा किंचितसा तुकडा मोडून खाल्ला आणि मग माझ्यावर आपले घारे डोळे रोखून तिनं गुर्र-गुर्र असा आवाज करून मला दम दिला!

नंतरच्या शनिवारी मी ऑफिसातून घरी येताच सौ. म्हणाली, "मी आज त्या शांता अय्यरकडं गेले होते. ती म्हणाली, डाळीचं पीठ खवायला हवं तरच त्या हलक्या आणि लुसलुशीत होतात. तिनं एक स्पेशल खलबत्ता हैद्राबादहून आणलाय. आपण तो घेऊन येऊ...

शांता अय्यरकडची कडक कडवट कॉफी मला फार आवडते. त्या मोहानं मी रविवारी सकाळी सौ. बरोबर तो खलबत्ता आणण्या-साठी तिच्याकडे गेलो. तिथं जाताच, सौ.नं तो विशिष्ट दगडी खल-बत्ता मला दाखविला आणि तो पाहून माझ्या हातापायातली शक्तीच नाहीशी झाली. ते अजस्र धूड आमच्या घरी नेणं माझ्या आटोक्याबाहेरचं काम होतं. नुसत्या वरवंट्याचंच वजन दहा किलो असावं!

"मी घेते वरवंटा. तुम्ही उचला पाहू ते उखळ!" सौ.नं हुकूम सोडला.

मी ते उखळ जिथल्यातिथं थोडंसं हलवून पाहिलं; पण ते तसूं-भरही सरकलं नाही. सौ. तर वरवंटा घेऊन तयार होती. तेवढ्यात शांता अय्यरनं माहिती पुरविली की, मिस्टर अय्यरांनी एका क्षणात तो खलबत्ता दोन जिने चढून वर आणला होता! पुरुषार्थ अशा प्रकारे डिवचला जाताच माझं मराठी रक्त सळसळलं. मनात अंजनीसुताचा धावा करीत मी तो अवाढव्य खल कचकन् उचलून पोटाशी घेतला. दोन जिने कसेबसे उतरलो आणि खाली जाताच, उखळ जरासं जमिनीवर ठेवलं; कारण पोटातली आतडी पार गोळा झाली होती!

"आता एकदा खाली कशाला ठेवलंत? उचलायला पुन्हा त्रास होतो." सौ. म्हणाली.

पुन्हा मी उखळ उचलून घेतलं.

तेवढ्यात, सौ.च्या डोक्यात कल्पितही कल्पना आली.








'थांबा हं ! मी आत्ता आलेच.' असं म्हणून तिनं आपल्या हातातला तो वरवंटा (वजन १० किलो) माझ्या हातातल्या उखळात ठेवला आणि ती पळत पळतच पुन्हा शांता अय्यरकडे वर गेली !

दहा मिनिटं मी त्या अवघडलेल्या अवस्थेत 'मारुतीस्तोत्र' पुटपुटत उभा होतो. सौ. पुन्हा पळत पळतच खाली आली आणि माझ्याकडे पहात फसफसून हसू लागली. काहीतरी सांगण्याचा प्रयत्न करायची पण तिला पुन्हा-पुन्हा हसू येत होतं. शेवटी मी चिडून ओरडलो, "अग, काय झालं ? माझा इकडं प्राण चाललाय !"

तेव्हा किंचित शांत होत पण मधून मधून हसतच सौ. म्हणाली, "अहो, हे एवढं धूड उचलून आपल्या घरी नेण्यापेक्षा मीच इडलीचं पीठ घेऊन शांताकडे येईन आणि रुबवून नेईन."

"छान ! हे आत्ता सुचलं वाटतं ?" मी रागावून ओरडलो.

सौ. म्हणाली, "अहो, आपल्या घराचे दोन जिने चढायचे तर वाचले ना ! चला आता पुन्हा वर."

पुन्हा दोन जिने चढून मी तो हेमाडपंती खलबत्ता होता तिथं ठेवला आणि 'हुश्य !' करीत तिथच कोचावर पडलो. माझ्या पायात गोळे आले होते आणि हातांची बोटं पार वाकडी झाली होती !

सौ. शांताला म्हणाली, "हल्ली त्यांना फारच वीकनेस आलाय. जरासे श्रम झाले की हाशहुश करतात."

थोड्या वेळानं चालण्याइतकी शक्ती येताच आणि शांता अय्यर कॉफी करण्याचं चिन्ह दिसेना तेव्हा मी सहकुटुंब घरी परतलो.

त्यानंतरच्या प्रत्येक रविवारी सौ.च्या इडली करण्याच्या ज्ञानात जास्त जास्त भर पडत गेली. (पण चवीत विशेष फरक नव्हता.) दर रविवारी नवीन नवीन मित्रांना पकडून आणायचं आणि त्यांना आग्रहानं इडल्या आणि जहाल चटणी खाऊ घालायची हा एक माझा साप्ताहिक कार्यक्रमच झाला. मित्रमंडळी काकुळतीनं 'नको नको' म्हणत असताना, 'तुम्ही फार संकोच करता बुवा !' असं म्हणत त्यांना आणखी इडल्या वाढण्यात मला आसुरी आनंद होत असे !

इडल्या खाल्लेल्या दिवशी बेडूक गिळलेल्या सापासारखं दिवसभर सुस्त वाटायचं. सिमेंट-वाळूच्या मिश्रणाच्या थराप्रमाणे इडल्यांचा जाडसर थर पोटात बसत असे. हा नवीन प्रकारचा लगदा पाहून आतड्यांना धक्काच बसत असावा ! त्याचं चूर्ण कसं करावं हे जठराला कोडं पडत असावं ! बैठा संप पुकारून सगळी पचनेंद्रिये त्या पदार्थांकडे पहात अगतिकपणे स्वस्थ बसत असावीत !

दुसऱ्या दिवशीसाठी, इडल्यांचं पीठ भिजत घातलेलं दिसलं की, मी रात्रीचं जेवण टाळीत असे आणि इडल्यांसाठी पोटात आधीच तरतूद करून ठेवीत असे. एक 'पर्गोलॅक्स'चं पाकीटही मला चोरून आणून ठेवावं लागे. त्या दुकानदारालाही ही गोष्ट माहीत झाली होती. दरखेपेस तो हसून म्हणे, "उद्या इडल्यांचा बेत दिसतोय !" त्यांचा मनस्वी राग यायचा पण इलाज नव्हता.

एका रविवारी भिडस्त विसुभाऊ दांडेकर आमच्या घरी आले आणि सौ.च्या आग्रहाला चांगलेच बळी पडले. 'आम्ही पानात काही टाकीत नसतो' ही त्यांची प्रतिज्ञा त्यांच्या चांगलीच अंगलट आली. एक एक करता करता त्यांनी तब्बल दहा इडल्या हाणल्या ! घरी जाताच त्यांच्या पोटात असह्य कळा सुरू झाल्या. डोळे पांढरे झाले. पोटात कसला तरी घट्ट गोळा हाताला लागत होता म्हणे ! तावडतोब त्यांना अॅम्बुलन्स गाडीतून हॉस्पिटलमध्ये हलविण्यात आलं.

आमच्याकडच्या इडल्या खाल्ल्याचं विसुभाऊनी सांगताच तासाभरात एक पोलीसच आमच्या घरी आला – आणि केमिकल अॅनलायझरकडे पाठविण्यासाठी त्यानं इडलीचा नमुना मागितला ! 'केमिकल अॅनलायझर' असा बडा हुद्दा धारण करणाऱ्या अधिकाऱ्याला नुसती इडली कशी द्यायची म्हणून सौ.नं इडलीबरोबर आमची सुप्रसिद्ध चटणीही दिली ! इडलीत आक्षेपार्ह काहीच सापडलं नाही. पंधरा दिवसांनंतर विसुभाऊंना हॉस्पिटलमधून डिस्चार्ज मिळाला !

दुसऱ्या एका सुट्टी दिवशी नंदू पाठक कधी नव्हे तो आमच्याकडे आला. तो नुकताच फॉरीनहून परतला होता त्यामुळं आमचं इडली प्रकरण त्याला तोपर्यंत अज्ञात असावं. त्यामुळं तो निर्धास्तपणे आमच्याकडे आला. गृहस्थ मोठा खादाड. गरम इडल्या आणि लालभडक चटणी पाहून त्याच्या तोंडाला पाणी सुटलं. मोठ्या आनंदात त्यानं इडलीचा समाचार घेण्यास सुरुवात केली. इडलीचा तुकडा मोडून चटणीत बुडवून नंदूनं तोंडात घातला आणि त्याचा वरचा श्वास वरच राहिला ! चेहरा भेसूर आणि डोळे अर्थातच पांढरे. आम्हा कोकणस्थांच्या पदार्थांना मिळमिळीत म्हणणाऱ्या त्या दे. ऋ. ब्राम्हणाची चमचाभर चटणीनं वाचाच बंद करून टाकली !

"एवढं नको आहे नाटक करायला !" सौ. फिसकारली, "फॉरीनमधे राहून तुम्ही फारच नाजुक झालात हं ! पडलं असेल चमचाभर जास्त तिखट. जरा साखर घालते."

चटणीची सुधारलेली आवृत्ती निघेपर्यंत नंदू पूर्वस्थितीप्रत आला होता.

नंतरही डाव्या हाताशी भरलेला पाण्याचा पेला ठेवूनच नंदू इडल्या खात होता. त्याची ती दयनीय अवस्था पाहून माझ्या डोळ्यात अश्रू उभे राहिले. (खरं म्हणजे डोळ्यातलं पाणी चटणीमुळंच होतं !) माझी साश्रु सहानुभूती पाहून नंदूनं मुकाट्यानं इडल्या खाल्ल्या.

पुढे पुढे, सुट्टी दिवशी माझ्याकडे एकही मित्र फिरकेना. बऱ्याच मित्रांना त्याबद्दल खोदून खोदून विचारलं. शेवटी, माझ्या नावे एक निनावी कार्ड आलं. त्यात लिहिलं होतं, "आम्ही वहिनींच्या इडल्यांच्या धास्तीनं तुमच्या घरी येत नाही. देव तुमचं त्यांच्यापासून (इडल्यांपासून) रक्षण करो !"

इडल्यांची एकवेळ चव चाखून गेलेला महाभाग पुन्हा आमच्या घरी मुळीच फिरकत नसे. याचा मी फायदा करून घेतला. दर सुट्टी-

अनुक्रमणिका



















अनुक्रमणिका

दिवशी येऊन नेमानं मला पीडा देणाऱ्या दोन अनिष्ट ग्रहांची मी शांती केली! एक म्हणजे विमाएजंट शिदोरे. (हा सद्गृहस्थ अगदी निर्विकारपणे म्हणतो की, 'तुम्ही फक्त मुलीचा विमा उतरा. तिचं लग्न आम्ही यथासांग करू. मग तेव्हा तुम्ही असा अगर नसा!) दुसरा ग्रह म्हणजे दर रविवारी येऊन मला आपल्या कविता ऐकविणारा कवि 'शर्मिलाभक्त'. ह्या दोघांनाही आग्रहानं घरी आणून मी इडल्या खाऊ घातल्या आणि पुन्हा केव्हाही ते दोघे आमच्याकडे फिरकणार नाहीत असा कायम बंदोबस्त केला! कवि 'शर्मिलाभक्ता'नं मात्र एका पोस्टकार्डावर एक राष्ट्रीयबाणा दाखविणारं काव्य लिहून माझ्याकडे पाठविलं आणि मला पोस्टद्वारे थोडासा त्रास दिलाय! त्याचं काव्य असं होतं –

'हव्या कशाला बंदुक-गोळ्या –
लाल चिन्यांची करण्या चटणी?
धाडुनि द्या हो सीमेवरती –
तुमच्याकडची इडली-चटणी!'

इडली-प्रकरण सुरू होऊन दीड-दोन महिने झाले तरी सौ.चा उत्साह कायम होता. कॉलनीत आमच्या इडल्यांचा चांगलाच बोलबाला झाला होता. फरशीवाले साठे, लोणीवाले सामंत याप्रमाणे आमच्याही आडनावामागे काही वात्रट लोकांनी 'इडलीवाले' ही उपाधी लावली होती!

शेवटी या इडलीच्या ससेमिऱ्यातून सुटण्यासाठी मी एक युक्ती योजली. आमच्या पार्थसारथी साहेबांचा स्टेनो एम्. मोक्षलिंगम् याला मी कटात सामील करून घेतलं. आमच्या इडली-चटणी प्रकरणाची दर्दभरी कहाणी मी त्याला सांगितली आणि आम्ही असं ठरविलं की –

मी सौ.ला सांगायचं की, पार्थसारथीसाहेब रविवारी चहा-फराळाला आपल्याकडे येणार आहेत. ती इडल्यांचाच बेत करणार याची मला खात्रीच होती. मग पार्थसारथीसाहेब म्हणून एम्. मोक्षलिंगम्नं यायचं आणि साहेबांची भूमिका व्यवस्थित वठवायची. शेवटी इडल्यांची भयंकर चव पाहून त्यानं इंग्रजीतून मला फाड्फाड् शिव्या द्यायच्या आणि रागारागानं चालतं व्हायचं!

मग मी सौ.ला सांगायचं की, साहेब फार चिडले. आता वाईट रिमार्क देतील आणि त्यामुळे पुढचं प्रमोशनही मिळणार नाही. याचा योग्य तो परिणाम होऊन सौ. इडल्यांचं फॅड बंद करील याची मला खात्री होती.

ठरल्याप्रमाणे, मी सौ.ला सांगितलं की, "पार्थसारथीसाहेब आपल्याकडे रविवारी चहाला येणार आहेत. शिरा-पोहे किंवा इतर काहीतरी पदार्थ कर."

सौ. म्हणाली, "तो पार्थसारथीसाहेब मद्रासीच आहे ना? मग त्याला इडल्याच खात्रीनं आवडतील."

माझा अंदाज बरोबर ठरला होता. सुरुवात छानच झाली होती. आता कट यशस्वी होण्यात कुठलीच अडचण नव्हती.


STATEMENT ABOUT OWNERSHIP AND OTHER PARTICULARS ABOUT NEWSPAPER "DIPAVALI" MONTHLY

FORM IV (SEE RULE 8)

| | | |
|---|---|---|
| 1. | Place of Publication | Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge, Bombay—4. |
| 2. | Periodicity | Monthly, on 1st of every month. |
| 3. | Printer's Name | Shri Dinanath Damodar Dalal. |
| | Whether Citizen of India | Yes. |
| | Address | 42, Kennedy Bridge, Bombay—4. |
| 4. | Publisher's Name, Nationality and Address | As per 3 above. |
| 5. | Editor's Name, Nationality and Address | As per 3 above. |
| 6. | Names and addresses of individuals who own the newspaper and partners or shareholders holding more than one percent of the total capital. | Shri Dinanath D. Dalal, Sole Proprietor. No partners or Shareholders. |

I, Dinanath Damodar Dalal, hereby declare that the particulars given above are true to the best of my knowledge and belief.

Date 1-3-1970

D. D. Dalal
Signature of Publisher

रविवारी सकाळी इडल्यांचा कारखाना सुरू झाला आणि थोड्याचे वेळात एम्. मोक्षलिंगम् टाय लावून साहेबांची भूमिका वठवायला आला. मी त्याला आदरानं नमस्कार केला. आणि बसायला खुर्ची दिली. सौ. एकदा बाहेर डोकावून गेली.

थोड्या वेळानं सौ.नं इडली-चटणीच्या प्लेट्स आणल्या. आणि समोरच्या टेबलावर ठेवल्या. चटणी नेहमीपेक्षा जास्तच जहाल दिसत होती.

"ओहोऽहोऽ इट्टली? व्हेरी गुड! व्हेरी गुड!" असं म्हणत मोक्षलिंगम्नं प्लेट पुढे घेतली.

सौ.ला साहजिकच हर्ष होऊन ती आणखी इडल्या आणण्यासाठी लगबगीनं आत गेली.

मी आगाऊ खबरदारी म्हणून पाण्याचा भरलेला ग्लास मोक्षलिंगम्कडे सारला! त्यानं इडलीचा तुकडा मोडला आणि माझ्या छातीचे ठोके जलद पडू लागले! पोटात (इडली न खाताच) गोळा आला! इडलीचा एक मोठा तुकडा चटणीत बुडवून मोक्षलिंगमनं तोंडात घातला आणि तो चिकट लगदा तो मोठ्या कष्टानं घशाखाली रेटू लागला. कसाबसा तो घास गिळण्यात यशस्वी झाल्यावर मोक्षलिंगमनं माझ्याकडे अशा नजरेनं पाहिलं की, जणू मी त्याचा खून करण्याचाच घाट घातला होता! तो प्लेटमधल्या इडल्यांचा फडशा पाडीत होता. इडल्यांचं वर्णन मी त्याला ऐकवलं होतं तरी त्यानं असा मूर्खपणा का करावा ते मला समजेना. प्रत्येक घासाबरोबर त्याला दरदरून घाम फुटत होता. बघता बघता त्याचे डोळे लालभडक आणि पाणीदार दिसू लागले – आणि तोंडातून शब्दच फुटेना. मोक्षलिंगम्चा प्राण क्षणात् मोक्षाकडे झुकत होता तर क्षणात भूतलावर!

अगदीच असह्य झालं तेव्हा मोक्षलिंगम उठून उभा राहिला.

तेवढ्यात सौ. बाहेर आली. मला वाटलं, आता ठरल्याप्रमाणे मोक्षलिंगमला रागारागानं इंग्रजीत मला शिव्या देणं तरी जमतंय की नाही कुणास ठाऊक! पण तो खरोखरीच चिडला असावा. त्यामुळं थरथर कापत त्यानं ते काम अगदी चोख बजावलं!

"यू इडियट, यू वाँटेड टू मर्डर मी? ..आय ॲम शुअर.. धिज वॉज ए डेलिबरेट प्लॅन टु किल मी ..यू यूसलेस फेलो. डॅम युवर इडली–चटणी..." असं काहीतरी जोरजोरात म्हणत मोक्षलिंगम् रागारागानं पाय आपटीत निघून गेला आणि मी मटकन् खालीच बसलो. आमचा कट शंभर टक्के यशस्वी झाल्यानं मनात आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या. आता फक्त सौ.नं पश्चात्ताप व्यक्त करणं आणि इडलीचं फंड सोडल्याचं जाहीर करणं एवढंच राहिलं होतं.

मी वर मान करून मोठ्या अपेक्षेनं सौ.कडं पाहिलं. पण ती दोन्ही हात कमरेवर ठेवून खुदूखुदू हसत होती! तिच्या मुखावर पश्चात्तापाची किंवा दुःखाची थोडीसुद्धा छटा नव्हती!

"एवढं काय मनावर घेता? गेला तर गेला रागावून!" सौ. हसतच म्हणाली.

"शरम नाही वाटत हसायला? – साहेब इंग्रजीत बोलले ते तुला कळलं नसेल – माझं सगळं रेकॉर्ड आता खराब होणार आहे. प्रमोशन मिळणार नाही. तुझ्या इडली-चटणीचा हा प्रताप आहे."

तरी ती हसतच होती!

मग मात्र मला शंका आली की आपला कट तर फसला नाही ना?

तेवढ्यात सौ. हसत म्हणाली, "अहो, तुमचं रेकॉर्ड खराब करण्याचा किंवा प्रमोशन न देण्याचा अधिकार साहेबांच्या स्टेनोला कुणी दिला?"

"स्टेनोला? कोण स्टेनो?" मी उठून उभं राहत उगीचच आवाज चढवून विचारलं.

"हा आत्ता आलेला मोक्षलिंगम् नावाचा तुमच्या साहेबांचा स्टेनो आहे!"

पुन्हा मी मटकन् खाली बसलो.

"मला फसवायला बघता काय? तुमच्या पार्थसारखी साहेबाऐवजी हा मोक्षलिंगम आल्याचं दिसताच मी चटणीत दुप्पट तिखट घातलं होतं."

"पण तो स्टेनो नव्हता. ते साहेबच होते!" मी एक शेवटचा प्रयत्न केला.

सौ. म्हणाली, "मिस्टर, इकडं बघा! समोरच्या भिंतीवर तुमच्या ऑफिसचा ग्रूप फोटो आहे. मागचे जोशी साहेब बदलून गेले आणि पार्थसारथी साहेब आले तेव्हाचा. खाली सर्वांची नावं लिहिली आहेत. त्यात दोन्ही साहेबांच्या मागे उभा असलेला तो हा काटकुळा चष्मिष्ट मोक्षलिंगम्! पार्थसारथी साहेब तर चांगले गरगरीत दिसताहेत."

कट पूर्णपणे फसला होता!

"चला आता राहिलेल्या इडल्या खायला!" असं सौ.नं दरडावून सांगताच मी मुकाट्यानं तिच्या मागोमाग चालू लागलो!

● ● ●

**यंदाच्या काही (चुकून) राहिलेल्या पदव्या!**




'रबात'रत्न







अनुक्रमणिका



# जिणे हे माझे केविलवाणे

—प्रभाकर अत्रे

**'दीपावली'च्या दिवाळी अंकापासून सुरू झालेल्या, हॉलीवुडची विख्यात अभिनेत्री बार्बारा पेटन हिच्या खळबळजनक आत्मकथेचा हा चौथा भाग... मिंक कोट नि हिऱ्याचा हार तिला मिळाला, पण कोणत्या परिस्थितीत ?...**

## तेव्हा आणि आता

अधुनमधून मला मानसिक दुर्बलतेचे, अगतिकतेचे झटके येतच राहिले. काय होतंय् ते साऱ्याना सांगता येत होतं; पण उपाय मात्र गवसत नव्हता. कुणी सांगत नव्हता. विनाशाकडे धावत जाण्याची उत्कट इच्छा माझ्या मनात उफाळून येत होती. विनाशातच जणु माझी तृप्ती दडलेली होती. संथ गतीने का होईना पण सर्वनाशाच्या दिशेनेच जणु माझा प्रवास चालू होता.

असा झटका आला की, मी सिगरेट पेटवीत असले तर त्याची ज्योत मला तीन इंच इकडे तिकडे असलेलीच दिसू लागे. लोक म्हणत की हा मद्याचा परिणाम आहे; पण मद्य घेतले असले नसले तरीही अशी जाण अधुनमधून यायचीच.

मला निग्रो आवडतात—माझ्यात जे काही तारुण्य-सौंदय उरले आहे त्यात त्याना रस वाटतो. गोरी माणसे मला आता चाहत नाहीत. माझे सर्व चांगले, भारी कपडे मी विकून टाकले आहेत. मला मद्यासाठी द्रव्य हवे असते.

कपड्यांवरून सहज आठवण झाली—मला मिळालेल्या पहिल्या फर कोटाची आठवण जणु तो कालच मिळाला असावा इतकी ताजी आहे. फर कोट म्हणजे चित्रपटतारकेच्या भावी यशाची नांदी! तिच्या विजयाचे जणु उषासूक्त!!

मद्याचा चषक समोर धरलेला असला, त्यातील फेस उफाळून वर येत असला तर मी त्या फेसाच्या पारदर्शक पड्यातून मला जे पहायचे असते ते पाहू शकते. त्या मद्यासाठी मला काही अंतर चालत जावं लागतं. एरव्ही मी आता कुठे जात नाही. कुणाला भेटत नाही. कुणाकडे पहात नाही. दिसावेसं वाटतं तेवढंच पाहते.

१९४७ सालची गोष्ट असेल. पण जणु हजार वर्षे झाल्यासारखी वाटतात. एका चित्रपटाच्या प्रीमियरला मी फर-कोट घालून गेले होते. गरज म्हणून नव्हे, शान म्हणून!

प्रीमियरनंतर मला वॉशिंग्टनमधल्या एका फार मोठ्या माणसाने खाण्याचे आमंत्रण दिले. नाव सांगत नाही, त्याची अडचण होईल म्हणून! पार्टी झाली. मला वाहन नव्हते. म्हणून मला एका विख्यात पोलाद व्यापाऱ्याच्या गाडीतून घरी पोहचविण्यात आले. त्या गृहस्थाचा सेक्रेटरी दुसऱ्या दिवशी माझ्या घरी आला. म्हणाला, "साहेबांनी भेट म्हणून काय देऊ विचारलंय्!"

"नेपोलियन ब्रँडी" मी म्हणाले.

एक आठवड्यानंतर त्या सेक्रेटरीने ब्रँडी तर आणून दिलीच; पण अशी मजेशीर भेट मागितली म्हणून कौतुकाची भेट म्हणून एक उंची व धवल रंगाचा 'मिंक कोट' आणून दिला.

त्यानंतर काही दिवसातच मि. स्टील (तो व्यापारी) याला हजारो डॉलर्सचा फायदा झाला. 'नेपोलियन ब्रँडी' लागू पडली म्हणायची!

मिंक कोटाच्या भेटीबद्दलचे माझे ओशाळेपण पार पळून गेले. मला प्रथमच लाभलेल्या हिरेमाणकांची अशीच आठवण

अनुक्रमणिका

येते. बऱ्याच वर्षापूर्वी तीही विकली गेली. उरली फक्त आठवण!

मी वयाने अठरा वर्षांचीच होते. पण त्या वयातही मी खूप शिकले होते. त्यामुळे जीवनाबद्दल आणि माणसांबद्दल मी बरेच आडाखे बांधू शकले होते. हॉलिवुडच्या डोंगरकपारीतल्या निकोलस कन्यॉन या काहीशा अरुंद व अंधाऱ्या अशा ठिकाणी एक बीटनिक पार्टी होती. साऱ्यांचे चेहरे जणु असे दिसत होते की, त्यांच्या नावावर पेढीत पाच डॉलर्सइतकी सुद्धा रक्कम शिलकीत नसावी.

## हिरे आसवात नाहतात

मला माणसं भेटतात ना तेव्हा "माझं तुझ्यावर किती किती प्रेम आहे आणि तुझ्याशिवाय मी जगू शकणार नाही" असं वारंवार सांगतात. पण करांचा भरणा करण्यासाठी मला हजार डॉलर्सची गरज आहे असं म्हटलं की, हीच माणसं एकदम मुकी होतात. प्रेयसीसाठी खरं तर माणसं वाटेल ते करायला तयार असतात. तिचं सुख तेच त्यांचं सुख –

सारी माणसं खो खो करून हसली. फक्त एक तरुण, देखणा मुलगा हसला नाही.

"तुला काय हवंय? किती पैसे हवेत" तो गंभीर आवाजात म्हणाला.

मी मुद्दामच टिंगलीच्या सुरात म्हणाले, "मला चित्रपटांच्या उद्घाटनाला, पाटर्यांना जावं लागतं. पण एखादा साधा हिऱ्यांचा हार सुद्धा माजजवळ नाही."

"किती पडतील?" तो त्याच सुरात म्हणाला.

"कल्पना नाही. पण तीन हजार डॉलर्स पडत असतील"

"तीन हजार डॉलर्स."

"तू कुणा बड्या – श्रीमंताचा मुलगा आहेस काय?" मी विचारले.

नकारार्थी मान हलवीत तो म्हणाला "मी गॅस पंप जॉकी आहे"

मला ते ऐकून वाईट वाटलं. त्याची भावना मात्र प्रामाणिक होती.

"मित्रा, त्यापेक्षा आपण असं करू या. आपण क्लबमध्ये जाऊ. तू माझ्यासाठी एखादं बऱ्यापैकी मद्य मागव. आणि मग मला विसरून जा"

"माझं नाव आहे जॉर्ज गार्डनर. मी मद्य देऊ शकेन आणि हिऱ्यामाणकांचा हारही –"

प्रकरण उगाच फार ताणले जाऊ नये म्हणून मी त्याला म्हणाले "हे पहा, मी जे बोलले ते काही तुला उद्देशून बोलले नाही. माझ्यावर प्रेम असल्याचा दावा करून नंतर पळ काढणाऱ्या माझ्या मित्रांना उद्देशून मी ते म्हणाले. तुझा माझा साधा परिचय देखील नाही."

"परंतु मी तुझ्या प्रेमात पडलो आहे" माझ्यावर नजर रोखीत तो म्हणाला.

मी त्याच्याकडे पहातच राहिले. तो गंभीर मुद्रेने पहात राहिला होता. मी निघाले तेव्हा तो येवढंच म्हणाला "मी तुला पुन्हा भेटेन"

एक आठवड्याच्या अवधीत मला विमा कंपनीकडून आणि त्याच्याकडून एक नोटीस आली. त्याच्या पॉलिसीबद्दलचे सर्व उत्तराधिकार त्याने मला दिले होते. प्रकरण गंभीर होत होते. मी अस्वस्थ झाले. त्याची भेट घेतली तेव्हा तो म्हणाला "मी मरणार आहे असं नाही मी हिऱ्यामाणकांच्या हारासाठीच खटपट करीत आहे. तो विश्वास देण्यासाठी ती पॉलिसी तुझ्याकडे पाठवून दिली इतकंच." तो सतत गंभीरच होता.

"येवढा देखणा आहेस तर सिनेमा नट का होत नाहीस?"

"मला ते शक्य नाही! माझा खास प्रांत कोणता ते मला ठाऊक आहे. स्थिर गाड्यांना तुफानी गती देण्याचं कसब ह्या माझ्या हातात आहे"

आम्ही प्रेमाने निरोप घेतला.

एका आठवड्यानंतर एका वर्तमानपत्रात मला त्याचा फोटो प्रसिद्ध झालेला दिसला. एका मोटार शर्यतीत त्याला दुसरे बक्षीस मिळाले होते.

महिन्यानंतर त्याच्याच सूचनेवरून मी एका बक्षीस समारंभाची पाहुणी म्हणून गेले. बक्षिसात जॉर्जचेही नाव होते. त्याला बक्षीस दिले जात असताना अनेक छायाचित्रे घेण्यात आली. तो मुळी जाहिरात-स्टंटच होता – असावा.

कार्यक्रमानंतर आम्ही खाण्यासाठी एका पॉश हॉटेलात गेलो. तो म्हणाला, "खरंच सांगतो बाबीरा, माझं तुझ्यावर फार प्रेम आहे. मी तसा लहान असेन पण माझ्या ह्या शर्यतीतले अनेक विक्रम तू पाहशील. ही कीर्ती सिनेनटांच्या कीर्तीपेक्षा कुठल्याही दृष्टीने उणी आहे असं मला वाटत नाही. तुझ्या त्या माळेचंही काम मी करणार आहे. आज एकाच दिवसात मला पाचशे डॉलर्सची कमाई झाली"

मी त्याला पैशांची बचत करण्यास सांगितले.

अधुनमधून त्याच्या विजयाच्या वार्ता तो मला ऐकवीत होता. मी त्याला आपले जीवन असे धोक्यात घालण्यापेक्षा सिनेनटाचा पेशा पत्करण्याचा आग्रह करीतच होते.

आणि एक दिवस –

त्यांच्या रेसच्या गाडीला अपघात झाला. गाडी उलटली. तिने पेट घेतला. कुंपणावर बसून रेस पाहणारा एक मुलगा जागच्या जागी ठार झाला. जॉर्ज जबर जखमी झाला. मी त्याला दवाखान्यात भेटले. डॉक्टर म्हणत होते, "पन्नास टक्के आशा आहे"

पण जॉर्जला भवितव्य कळले असावे.

त्यानंतर तीनच दिवसांनी तो मरण पावला.

माझ्या आयुष्यातला तो एक दुःखद दिवस होता. विमा कंपनीने मला तीन हजार डॉलर्सचा चेक पाठवून दिला. मी खूप रडले. रक्कम मोठी होती. मी त्या पैशाची पैन् पै हिऱ्यांचा हार घेण्यात वेचली. त्यातल्या प्रत्येक हिऱ्याने आसू झेलले. पण जॉर्जचा आत्मा मात्र

अनुक्रमणिका





तृप्त झाला असेल. ते त्याचे स्वप्न होते. आणि अशा विचित्र रीतीने ते साकार झाले होते.

मला मिंक कोट मिळाला. हिऱ्याचा हार मिळाला आणि त्याच सुमारास मला दारुण अपेक्षाभंगही मिळाला. त्यातून टणक मनाची, संशयी, आणि काहीशी स्थिरप्रज्ञ बार्बारा जन्माला आली. त्यामुळे मला बनवणे, नुसती वचने देऊन झुलवणे, माझ्या सौंदर्याची एकतर्फी उधळण करून घेणे कधी कुणाला जमले नाही. भोळेपण पळाले. कोवळेपण गळून गेले–झडूनच गेले जणु !

## अंगाशी आलेला प्रयोग

बीव्हरली हिल्समधील बीव्हरली हॉटेलच्या एका टेनिस सामन्याच्या वेळी एका विख्यात चित्रनिर्मात्याची माझी योगायोगाने भेट झाली. चहा-ड्रिंक झाल्यावर त्याने मला जेवणाचे निमंत्रण दिले. मला एक नवाच प्रयोग करून पहायची लहर आली. माझे मानसशास्त्र मला पडताळून पहायचे होते. मी त्याला म्हणाले, "मी येईन पण माझ्या काही अटी आहेत"

"बोला !"

मला चित्रपटात कुठली भूमिका देणे शक्य आहे ह्या विषयावर तुम्ही बोलायचं नाही किंवा कुणा प्रथितयश निर्माते–नटांचा परिचय करून देण्याच्या भानगडीत पडायचे नाही. किंवा हॉलिवुडच्या नियतकालिकातल्या प्रसिद्धीसाठीही त्याचा वापर करायचा नाही. मी फक्त एक मैत्रिण म्हणून येईन"

'गंमतच आहे' असं सुचवीत त्याने ते मान्य केलं. त्यानंतर आम्ही अनेकदा एकत्र हिंडलो, फिरलो, जेवलो. पण त्याने शब्द पाळला. त्यामुळे उलट मीच अस्वस्थ झाले–तो चित्रपट काढीत होता, पण मला मात्र शब्दाने विचारीत नव्हता.

माझी अस्वस्थता मी व्यक्त केली. तेव्हा त्याने मला निरनिराळ्या भूमिकांसाठी चाचणीला बोलावणे पाठवायला दिग्दर्शकांना सांगितले. चाचणी होत असे ; पण भूमिका मात्र मिळत नसे. एक दिवस मी खूप चिडले. त्या निर्मात्याला मी त्याबद्दल विचारले– तेव्हा तो म्हणाला, "तू फार अस्वस्थ झाली होतीस. म्हणून तुला आनंदी करण्यासाठी मी ते करीत होतो."

"पण मला तुम्ही चित्रपटात काम का देत नाही ?"

कारण ह्या दोन नात्यांचा माझ्या मनात नेहमीच गोंधळ उडतो. एखादी मुलगी मला आवडते म्हणून तिला भूमिका देण्याच्या कल्पनेचा मी तिरस्कार करतो"

त्याने केलेली फसवणूक, घोर निराशा आणि माझा वाया घालविलेला काळ – त्याला जणु कशाचीच पर्वा वाटत नव्हती.

त्या क्षणापासून मी सावध झाले.

## एकटी मी एकटी –

मला भूमिका मिळत गेल्या. दौलत मिळत गेली. मी श्रीमंत बनले. शहाणी आणि कठोरही बनले. हे सारं माझं – एकटीचं ही भावना प्रभावी होत गेली. कुणावर विश्वास ठेवणार ! निराशे म्हणून निराशा – अपेक्षाभंगापासून अपेक्षाभंग –

त्यातूनच मी हे शिकले.

क्लार्क गेबल, केरी ग्रँट, चार्लस् लॉटनपासून ते लाना टर्नरपर्यंत साऱ्यांचा माझा परिचय झाला. दर दिवशी माझे नाव वृत्तपत्रात झळकू लागले. वृत्तपत्रातील फिल्मी विभाग तेवढाच वाचून बाकीची पाने मी फेकून देत असे. हॉलिवुड रिपोर्टर आणि तत्सम वृत्तपत्रे मी नेमाने वाचू लागले. जणु तेच माझे बायबल होते.

चित्रपटव्यवसाय हेच जणु माझे सर्वस्व बनले. चांगल्या सवयी, चांगली मूल्ये, चांगले वर्तन मी करीत होते.

सारं कसं छान चाललं होतं.

पण यशाला उतरंड लागली आणि मग साऱ्या जीवनाचाच जणु तोल गेला. कष्टमय दिवस घालवून रात्री दहा वाजता मी घरी गेले की अंग पार आंबून जाई. हाडे खिळखिळी होत असत. मी मग स्वतःशीच रडत बसत असे. त्या अश्रूंवर औषध मिळालं खरं पण ते औषधच रोगापेक्षा महाभयंकर होतं.

त्या औषधाचं नाव होतं–मद्य !

मद्याचा चषक तोंडाला लावला की साऱ्या वेदना जणू त्या पेयात बुडून जात.

मी मद्यपी बनले नव्हते ; पण रात्रीचे जेवण झाल्यावर झोप येईपर्यंत मात्र मी पीत असे.

## थाप आणि पाप –

टॉम नीलबरोबरच्या प्रणयसंबंधातून माझी घरंगळ सुरू झाली असं माझ्या बऱ्याच मित्रांचं मत आहे. पण टॉमची व माझी भेट होण्यापूर्वी मला एक माणूस भेटला होता. त्याचं नाव होतं "**बड कीलर**" (हे खरं नाव नाही हं) हालिवुडमधल्या तरुणींची जीवने उध्वस्त करण्यात त्याची बरोबरी कुणी करू शकेलसे मात्र वाटत नाही. **बड** हा एक देखणा, श्रीमंत, आकर्षक व्यक्तित्व लाभलेला असा उमदा तरुण होता. त्याचा माझा परिचय एका बारमध्ये झाला. त्यादिवशी तो रेस हरला होता आणि संतापाच्या भरात तो रेसची तिकिटे फाडून टाकीत होता. तेव्हा त्याच्या हाताचा धक्का मला लागला. त्याने क्षमा मागितली. पण त्यातून आमचा परिचय मात्र झाला.

मग एक दिवस त्याने रेसची तिकिटे खरीदली. ती माझ्यासमोर धरीत तो म्हणाला, "ह्यावर तुझी भाग्यवान फुंकर घाल की !"

मी तसे केले. पण भाग्य उजळले नाही. तरीही तो निराश झाला नाही. बड म्हणजे जणु उत्साहाचे कारंजे, उमेदीचा सागर, कल्पनांचा कुबेर, विनोदाचा बादशहा आणि योजनांचा हिमालय होता.

आणि –

खोटारडेपणाचा तर तो कळसच होता !! त्याच्या थापेबाजीला जणु सीमाच ठाऊक नव्हत्या. सारं मला कळत होतं आणि तरीही त्याला सोडून जावं असं मात्र मला वाटत नव्हतं. पाचव्या

अनुक्रमणिका






पर्यंतीच्या आधी तो मला भेटला आणि सातवी रेस संपत असता त्याने मला लग्नाची मागणी घातली.

दुसऱ्याच दिवशी मला कळलं की त्याचं लग्न झालं होतं, त्याला दोन मुलं होती आणि तो बायकोमुलात व्यवस्थित रहात होता.

आमच्या दोघातही खलत्वाचा सूक्ष्म आणि समान धागा होता–त्याचीच जणु एकमेकांना ओळख पटली असावी. त्या आकर्षणातूनच आम्ही एकमेकांच्या जवळ आलो. मी मनाने चांगली होते. वृत्तीन चांगली होते. मूल्येही मानणारी होते. तरी का कुणास ठाऊक, मनात कुठेतरी पापाचे, खलत्वाचेही मला आकर्षण वाटत आले आहे. वडच्या सहवासात त्याच्याच शिकवणीतून मी वाईटाशी सामना करायला शिकले. माझा विवेक वोथटला. जीवन भोगावे कसे तेही मी शिकले आणि पाप-पुण्यातून पार कसं पडावं ह्याचीही शिकवण मला वडकडूनच मिळाली.

वडच्या काही कृती मात्र कोडयात टाकीत असत. वेनी नावाच्या एका कुबडया नटाची त्याने केलेली जीवघेणी टिंगल मला अजूनही आठवते. त्याची दृष्टी फार खराब होती. सुदृढ व सुडौल शरीराची एखादी तरुण स्त्री भोवती वावरत असली की वेनी फार अस्वस्थ व्हायचा पण त्याच्यातल्या व्यंगामुळे हे भाग्य त्याच्या वाट्याला कधी येत नसे.

वडने वेनीची गंमत करायचं ठरवलं. त्याने एका मुलीची आणि त्याची गाठ घालून दिली ; पण त्यांना त्याने मोकळे सोडले नाही. त्या दोघांना व मला बरोबर घेऊन तो सागरतीरी गेला. आम्ही तेथल्या एका हॉटेलात उतरलो. वेनी तसा मनातून घाबरलेला होता. त्याचा तो पहिलाच अनुभव असावा. परंतु वडने त्याला धीर दिला. आम्ही त्यांना निरोप दिला व 'वुइश' केले.

काही तासातच धाडधाड जिना उतरून वेनी खाली आला आणि काही बोलणे पूर्ण होण्याच्या आतच तरातरा किनाऱ्याकडे निघून गेला. तो गेला त्या दिशेकडे आम्ही पहातच राहलो.

नंतर मी मान वळवली.

जिन्याच्या वरच्या बाजूला ती स्त्री नग्न अवस्थेतच उभी होती.

मी चकित होऊन पहातच राहले.

ती स्त्री नव्हती.

तो एक पुरुष होता.

मला चांगली कामे मिळत होती. पैसाही मिळत होता. कीर्ती लाभत होती आणि तरीही वडचे सर्व गुणदोष ठाऊक असूनही मी त्याच्याबरोबर राहण्या–भटकण्यात धन्यता मानीत होते.

१९४९ सालची अखेर असेल. चित्र पूर्ण होत आलं होतं. टेलिव्हिजनसाठी मुलाखत दिल्यामुळे चित्रपटाची पर्यायाने जाहिरात होईल म्हणून विचारणा झाली. वडने होकार दिला. परंतु प्रत्यक्ष मुलाखतीच्या दिवशी मात्र त्याने मोटार बाहेर काढली–आणि मोटारला एक छोटाच अपघात घडवून आणला. मुलाखत चुकली.



त्याचा डाव मला कळला तेव्हा मी मुद्दाम वेगळी मुलाखत योजिली परंतु त्याची बातमी बडला लागली. त्याने मला घरात बंदिस्त करून टाकले–आणि मी त्या कार्यक्रमाला जाऊ शकले नाही. मी वडविरुद्ध तक्रार नोंदविली. त्याला अटक झाली. तो तीन दिवस तुरुंगात राहिला. बाहेर आला तेव्हा मला म्हणाला, "तू आता शिकू लागली आहेस बेबी".

पुन्हा आमची दोस्ती जमली; पण माझ्या एका निर्मात्याला त्याने जेव्हा थाप मारली की, मला काही संसर्गजन्य रोग झाला आहे आणि पुरावा म्हणून माझ्या डॉक्टरचा बनावट रिपोर्ट त्याने त्याला दाखवल्याचे मला कळले तेव्हा मात्र त्याचे तोंडही न पहाण्या ; मी

मनोमन निश्चय केला. आणि तो मग पाळलाही.

माझ्या जीवनावर त्याचा फार मोठा प्रभाव होता ही गोष्ट मात्र मला कबूल करायलाच हवी. * *

## ( असे हे ) काळे-गोरे

म्हटलं तर सारं काही बरं चाललं होतं. आणि नव्हतंही! माझा चिमुकला मुलगा टेक्सासला माझ्या आईवडिलांकडे वाढत होता. भूमिका, यश, मिळत होतं. पैसा मिळत होता. स्थिरता लाभली आहे असंही वाटत होतं. त्याच काळात रॉबर्ट (खरं नाव नाहीयू) ह्या निग्रो नटाचा आणि माझा परिचय झाला. तो कवि होता. स्वप्नाळू वृत्तीचा होता. मला तो आवडला ; परंतु आमची दोस्ती बरी नव्हती, एकत्र येणे ह्या व्यवसायात खपणारे नाही, असं तो मला वारंवार सांगत होता. मी ते मनावर घेत नव्हते.

एक दिवस मात्र स्टुडियोच्या कार्यालयातले बोलावणे आले. मी गेले. अधिकारी मला म्हणाला, "निग्रोंच्या बरोबर राहणं बरोबर नाही. थांबव ते"

"थांबवलं नाही तर?"

"दोघांनाही इथून जावं लागेल."

मी रॉबर्टला सारं काही सांगितलं—तो म्हणाला, "हे असंच घडत आलं आहे. घडत राहील."

एके रात्री मी त्याच्या घरी गेले होते. एकच खोली होती. मी त्या रात्री त्याची शय्यासोबत मागितली. त्याने स्पष्ट नकार दिला. आमच्या नात्यात गुंतागुंत व्हावी असे त्याला वाटत नव्हते.

आम्ही भरपूर मद्य घेतले.

स्टुडियोत एक कॉक्टेल पार्टी होती. आम्हाला आमंत्रण होते. मी रॉबर्टला म्हणाले, "आपण दोघांनी बरोबर जायचं—अगदी हातात हात घालून!"

त्याने नकार दिला. "दोघांचेही आयुष्य बरबाद होईल" तो म्हणाला.

"पण तू आला नाहीस तर मी तुला पुन्हा कधी भेटणार नाही. तुझ्याशी बोलणार नाही. हा निर्णय—निर्धार पक्का!"

तो उठला—आम्ही पार्टीला गेलो. स्टुडियोचे अधिकारी संतापले; पण त्यांनी तेथे काही तमाशा केला नाही. दुसऱ्या दिवशी मला ऑफिसात बोलावून घेऊन ते म्हणाले, "मी तुला कोणत्याही क्षणी घालवून देऊ शकतो"

"घालवून देऊ शकता ; पण घालवणार नाही. बरेचसे चित्रपट अर्धवट झालेले आहेत हे एक कारण आणि तुम्ही ह्या कारणासाठी मला घालवलंत तर दक्षिणेत तुम्हाला एक दिडकी मिळायची नाही हे दुसरं!"

स्टुडियोतल्या पार्टीला एका निग्रोला घेऊन येऊन पुन्हा असं मोकळं सुटता येईल असं तुला वाटलं होय? तू बघशील आता—तुला आणि त्याला आम्ही काय धडा शिकवतो ते!"

"काहीही घडणार नाही! घडलंच तर मी वृत्तपत्रातून प्रसिद्धी देईन. फिर्याद करीन. हजारो रुपयांचे नुकसान होईल. तुम्ही राकटपणाने आडदांडपणे वागलात तर मलाही तसं वागावं लागेल आणि रॉबर्टलाही काही शासन घडलं तर हे आणि असंच घडेल"

नंतर काही घडलं नाही. मी जिंकले.

त्या रात्री मी रॉबर्टला खूप मद्य दिले आणि शय्यासोबतही!

दुसऱ्या दिवशी सकाळी तो मला म्हणाला, "माझ्या पद्धतीने मी तुझ्यावर प्रेम करतो—आणि म्हणूनच तुला विनवतो की, तू माझ्या आयुष्यातून निघून जा. पुन्हा भेटू नकोस. मला धर्य, ध्येयनिष्ठा, तत्त्वज्ञान यांची प्रतिमा होण्याची इच्छा नाही. मला एकटं राहायचंय्. कधीतरी लहान मोठ्या भूमिका करायच्या आहेत. गुंतागुंत निर्माण होऊन तुझ्या करियरची बरबादी व्हावी असं मात्र मला मुळीच वाटत नाही"

नाइलाजाने मी त्याला निरोप दिला. तो गेल्यावर मी एक निग्रो बाई कामाला ठेवली. तिचं नाव होतं स्टेला! तरुणपणी गोऱ्या माणसांनी तिचा भरपूर उपभोग घेतला. पैसेही दिले—त्याला ती नंतर कंटाळली. एका माणसाकडे ती दोन वर्ष होती—तसंच सारं आयुष्य काढावं असं तिला वाटत नव्हतं—म्हणून तिने ते काम सोडलं होतं. बोलता बोलता त्या माणसाचं नाव तिने घेतलं. मी चकित झाले. निग्रो माणसांबद्दल अत्यंत तिरस्काराने बोलणारा पण तिला मात्र सांभाळणारा तो माणूस कोण होता? कोण असेल?

—स्टुडियोत मला ताणणारा बॉस!!

मी मग एक गम्मत केली.

त्या स्त्रीला शय्येवर नग्नावस्थेत झोपायला सांगून मी तिची छायाचित्रे घेतली.

आणि ती बॉसच्या टेबलावर टाकीत मी त्याच्या पालटल्या चेहऱ्याकडे पहात उभी राहिले. ते फोटो झटकन खिशात टाकीत तो म्हणाला, "तुला उदंड आयुष्य आणि उदंड यश लाभेल बार्बारा. तू आमच्याच बरोबर असशील"

"खरंच!"

"आपण सारेच चुका करतो. मी काय—तू काय!" असं म्हणत तो फोनकडे गेला. फोनवर कुणाला तरी आज्ञा देत म्हणाला "नॉर्थवुडचं स्क्रिप्ट बार्बारा पेटनला द्या. ती भूमिका चांगली पार पाडील".

भूमिका मिळालीही ; पण मी त्यासाठी काही तिथे गेले नव्हते. मी त्याचा तिरस्कार करीत होते आणि त्याला त्याची जाणीव मला करून द्यायची होती.....

[ क्रमशः ]






अनुक्रमणिका


पत्रें लवकर
पेटींत
टाका
कामाच्या शेवटच्या तासांत,
संध्याकाळीच जास्ती पत्रे टपाल
पेटयांत टाकली जातात. ही टपाल-कचेऱ्यां-
पुढील एक मोठी समस्या आहे. त्यामुळे
डाकेची गर्दी होते व विलंबही संभवतो.
टपालात पत्रे लवकर टाकल्याने ती
त्याच दिवशीच्या डाकेने रवाना
होण्याची खात्री असते. तसे केल्याने इष्ट
स्थळी ती उशीर न होता पोहचतात.
पत्रे आताच टाका, संध्याकाळपर्यंत कशाला थांबता ?
भारतीय टपाल व तार खाते
davp 69/19










## प्रतिभासंपन्न
## विष्णु वामन शिरवाडकर

कोल्हापूरला भरणाऱ्या नाट्य संमेलनाच्या अध्यक्षपदी कवि कुसुमाग्रज तथा विष्णु वामन शिरवाडकर यांची अविरोध निवड झाल्याचे वृत्त वाचून झालेला आनंद प्रथम व्यक्त करतो. कुसुमाग्रज आणि विष्णु वामन शिरवाडकर ही लौकिक अर्थानी दोन नावे आपल्याला परिचित असली तरी वस्तुतः हे सारे व्यक्तित्व एकात्म, एकसंध व काव्यात्म असे आहे. कवि कुसुमाग्रज यांच्या कवित्वात मृदु, मुलायम कवितेबरोबर घणाघाती व क्रांतिप्रवण विचार असतात आणि त्यांच्या गद्य लेखनाला काव्याचा डौल, काव्याची मृदुता, काव्याचे सौंदर्य लाभलेले असते. ह्या माणसात आणि त्यामुळे पर्यायाने त्याच्या लेखनात ह्यामुळेच कधी रुक्षता आली नाही. गद्य पद्यमय झाले आणि पद्यातून अंतर्मुख करणारा, प्रेरणा देणारा, मोठेपण वाढवील असे संस्कार करणारा प्रभावी, तेजस्वी गद्य विचारही अभिव्यक्त झाला. हे सारे घडत असताना कलेचा डौलही बिघडला नाही की तोलही गेला नाही. याचे एक कारण मला तरी असे वाटते की, त्यांच्या मनात आपल्या कला साधनेविषयी सुस्पष्ट कल्पना प्रथमपासून आहेत—असाव्यात. भ्रम नाहीत-नसावेत ! आपले व्यक्तित्व व व्यक्तित्वाबरोबरच साहित्य बनत—घडत असते. पुष्कळदा लोकप्रियतेच्या व प्रतिष्ठेच्या लाटेवर माणसे स्वार होतात—पण तो त्यांचा स्वभाव नसेल तर माणसांची मांड ढिली होते आणि ती कोलमडून खाली पडताना आपण पाहतो. पण शिरवाडकर यांच्या कला साधनेला 'स्वधर्म' कळला आहे आणि 'स्वधर्मा'-बाबतचे इमान कसे पाळावे तेही कळले आहे. त्यामुळेच त्यांच्या साहित्य साधनेला बाजारी—'मागणी-पुरवठा' सिद्धांताचा स्पर्श झाला नाही, बाजारी गति तिला लाभली नाही. मनात आकार घेत राहिली आणि 'स्वाभाविक' प्रक्रियेने ती कोष फोडून बाहेर पडत राहिली. शिरवाडकर हे अंतर्बाह्य साहित्यिक आहेत. कवि आहेत. वाचन, मनन, चिंतन, निदिध्यास आणि मग लेखन-भाषणादि 'स्वाभाविक' गोष्टी अशा क्रमाने ते लिहीत—वागत आले आहेत. ह्या अष्टपैलू साधनेतून त्यांची प्रतिभा विविध रूपांची आणि रंगांची शोभा धारण करीत आली आहे. कवि, कथाकार, लघु निबंधकार, निबंधकार, श्रुतिका-एकांकिका लेखक, नाटककार, पत्रकार, संपादक, समाजसेवक, संघटक व क्रियाशील देशभक्त, चिंतक, व वक्ते आदि अनेक गोष्टी शिरवाडकर ह्या व्यक्तित्वात एकरूप झालेल्या आहेत. विचारघन, आशयघन आणि काहीशी शाहिरी परंपरेची (प्रेरक, उत्तेजक अशी) कविता लिहूनही कुसुमाग्रजांची कविता रुक्ष, प्रचारकी व क्षणिकाचे 'भक्ष्य' झाला नाही. कारण कुसुमाग्रज हे हाडाचे कवि आहेत आणि कवीला 'जे न देखे रवी' पाहण्याइतपत द्रष्टेपण असावेच लागते. असा माणूसच 'क्रांतीचा जयजयकार' करू शकतो आणि 'बर्फाचे तट पेटुन उठले, सदन शिवाचे कोसळले'ची रणनौबत बजावू शकतो. ही व अशी अनेक गीते ही जेव्हा अनेक 'मोहनां' ची निःश्वसिते होतात तेव्हा क्षणिकातले चिरंतन ह्या कलाकाराला उमगले आहे हे ध्यानी येते. लौकिकाची गणिते मांडून अलौकिकाचा चंद्र हाती येत नाही. त्या चंद्राचे वेड हा स्वभाव बनावा लागतो. शिरवाडकर यांची वाङ्मयनिष्ठा व कलानिष्ठा ह्या जातीची आहे. त्यांची नाटके—दुसरा पेशवा, कौंतेय, ययाति-देवयानी, आमचे नाव बाबूराव, राजमुकुट—नाट्य आणि काव्य यांची सुरेख मैफल सजली आहे ह्याचा प्रत्यय देऊन जातात. संघर्ष शोधण्याची व त्याला व्यापक व्यथा-वेदनेची साथ देऊन काव्यात्म पद्धतीने तो मांडण्याची 'प्रकृति' त्यांना गवसली आहे—लाभली आहे. शिरवाडकर नाटक लिहीत असले तरी त्यांचा कविमित्र कुसुमाग्रज त्या बैठकीला न चुकता हजर असतो आणि त्यांच्यातला कवि कुसुमाग्रज जेव्हा नक्षत्र—तारकांशी गोष्टी करीत हिरवळीवर एकटाच पहुडला असतो तेव्हा वि. वा. शिरवाडकर नावाचा त्याचा एक सखा जवळपासच त्याची सोबत करीत असतो. 'क्रियाशील' साहित्यिक ही खास शिरवाडकरांची कमाई आहे. 'समाज क्रांति' हा त्यांचा श्वास आहे. ध्यास आहे. आणि त्यासाठी वाणी—लेखणीसारखी कधीही जुनी न होणारी व धारदार शस्त्रे आपल्या हाती आलेली आहेत ह्याचा सार्थ अभिमान ते बाळगतात. ह्या साऱ्या गोष्टी तर मला महत्त्वाच्या वाटतातच. पण वि. वा. शिरवाडकर यांच्यातला प्रसन्न, स्नेहशील, आतिथ्यशील, निरहंकारी, स्मित व स्थिरप्रज्ञ सद्‌गृहस्थ मला फार फार मोलाचा, महत्त्वाचा वाटतो. स्नेहाचे सोने हा बाळगून आहे. प्रसन्न व हसरी मुद्रा, मोहक बोलणे आणि स्वच्छ व स्पष्टचिंतन ह्यामुळे 'मैफली' रंगतात. मनात घर करून राहतात. जो स्वतः घडतो आणि भोवती घडवीत (ही) राहतो अशा कलाकाराला 'प्रतिभासंपन्न' म्हणतात. वि. वा. शिरवाडकर तसे आहेत. कुसुमाग्रज हा तर कवितेतला परवलीचा शब्द आहे. असे हे दुहेरी पण एकात्म व्यक्तित्व नाट्यसंमेलनाच्या अध्यक्षपदी बसले हा सुयोगच ! मी दोघांचेही अभिनंदन करतो. दोन मिळून एक अध्यक्ष घडला आहे म्हणून ! !

## मराठी नाटकाचा (अ. भा.) "विजय"

मराठी नाटक खुजे आहे, थिटे आहे, संगीताने त्यातले नाट्य मारले आहे वगैरे चर्चा आपण वर्षानुवर्षे मख्खपणे






ऐकत ध्याली आहोत. त्याचा फारसा परिणाम करून न घेता आपण रंगभवन–मंदिराभोवती गर्दी करीतच आलो आहोत. काही प्रायोगिक तर काही व्यावसायिक अशी नाटके पुढतीच हा मराठी पिंड घडत आला आहे. ह्या जडण घडणीत ज्या प्रयोगशील नाटककारांचा सिंहाचा वाटा आहे अशा एका नाटककाराला आता अखिल भारतीय कीर्ती लाभली असून त्याच्या त्या प्रयोगशील नाटकाची आता बारा भारतीय भाषात भाषांतरे होणार असून एकाच दिवशी बारा ठिकाणी त्या नाटकाचे प्रयोग सादर केले जाणार आहेत. एक मराठी नाटक आपापल्या भाषेतून बारा ठिकाणची माणसे पाहणार आहेत. त्यातल्या ललित–गंभीर आशयाशी ते समरस होणार आहेत. मला तर ही कल्पनाच मोठी हृद्य व भूषणास्पद वाटते.

मराठी नाटकाला अखिल भारतीय नाट्यपीठ मिळवून देणाऱ्या पहिल्याच भाग्यशाली नाटककाराचे नाव आहे **विजय तेंडुलकर** ! मराठी नाटकाची ध्वजा प्रांतोप्रांती नेऊन विजय संपादन करणाऱ्या विजय तेंडुलकरांचे मी प्रथम मनःपूर्वक अभिनंदन करतो. तेंडुलकरांना आज हे यश, कीर्ती (व द्रव्यही) लाभले असले तरी ह्या साऱ्या यशाचा त्यांचा मार्ग मात्र कंटकाकीर्ण होता. खाचखळग्यांनी भरलेला होता. अनेक (लौकिक) अपयशांनी भरलेला होता. संघर्षमय होता. काहीसा (बंडखोरीचा असल्यामुळे) एकाकीही होता. परंतु तेंडुलकर यांनी तारुण्य (अक्षरशः) राखले तसेच लेखणीचेही तारुण्य कायम राखले. तारुण्यातली बंडखोरी, नव्याचा शोध घेण्याची व त्यावर तुटून पडण्याची जिद्द, तारुण्यसुलभ स्वप्न-ध्यास आणि स्वप्नसुलभ द्रष्टेपण, तारुण्यसुलभ हळवेपण व कणव, सहानुभूत मन, ढासळणाऱ्या भिंती पाहून अस्वस्थ होणारे एका क्रियाशील कलावंताचे तडफडते मन – ह्या साऱ्या गोष्टी तेंडुलकरांनी कायम राखल्या आहेत. जीवनाचे पुस्तक त्यांनी मन लावून अभ्यासले आहे व 'वाचून चुकलो' अशी 'बनचुके'-पणाची भावना त्यांनी बाळगलेली नाही. प्रौढत्वी (तसे ते प्रौढ झालेले नाहीतही) निज 'शैशव' जमले नाही. त्यामुळे तेंडुलकरांच्या चेहऱ्यावर एक निरागस मिश्किलता नेहमीच वसत असते. भेदक दृष्टी, शोधक नजर, जिज्ञासू वृत्ती, अनेक प्रश्नचिन्हे मनात वागवीत फिरणारी सृजनशक्ती आणि त्याहूनही महत्त्वाचे म्हणजे ह्या साऱ्यांकडे पाहताना साधलेली अलिप्तता ! कुठल्याही नव्या प्रयोगांचे यश अनेक अपयशांच्या पायऱ्यांवरूनच चालत येत असते. स्थितीप्रिय गतीशून्य व काहीसा सिनिक् बनलेला समाज हे तर अशा प्रयोगशीलांना नेहमीच एक मोठे आव्हान असते तेंडुलकरांनी 'श्रीमंत'-पासून ते 'शांतता'पर्यंत अनेक नाटके लिहिली. श्रुतिका–एकांकिका लिहिल्या, बालनाट्ये लिहिली आणि बालनाट्य संमेलनातूनही ते बोलले. परंतु तेंडुलकरांच्या नाटकांना रूढ अर्थाने लौकिक यश काही मिळाले नाही. तरीही आजच्या मराठी रंगभूमीच्या कुणाही प्राथमिक समीक्षकाला, भाष्यकाराला 'विजय तेंडुलकर' ह्या नावाच्या धडपडणाऱ्या मुलाच्या प्रयत्नांची-प्रयोगांची दखल घ्यावीच लागेल इतके ते प्रयत्न स्वयंभू, स्वयंपूर्ण व पृथगात्म स्वरूपाचे आहेत.

तेंडुलकरांना माणसांचे (त्यांच्यातल्या प्रकृति-विकृतीसह) वेड आहे. गप्पांचे वेड आहे. शोधकपणे जीवन पाहण्याचा वेध त्यांना आहे. त्यातूनच त्यांनी मराठीला अनेक कथा, श्रुतिका, एकांकिका, नाटके दिली. अनेक 'वेधक' चिंतने दिली. 'रातराणी'चा सुगंध व नाट्यसमीक्षेला नवे परिमाण दिले. तेंडुलकरांची कथा–एकांकिका –श्रुतिका रसहीन, रुक्ष नाहीत. कुचंबलेल्या माणसाच्या कथा–व्यथांचा तोंडवळा विनोदी, उपहासगर्भ व काहीसा हलकाफुलका वाटला तरी आशय करुणघन, डोळे ओलावणारा, अस्वस्थ करणार असाच होता. ही अस्वस्थता मी माणूस नावाचे बेट, मधल्या भिंती, मी जिंकलो, मी हरलो, एक हट्टी मुलगी, शांतता, अजगर–गंधर्व ह्यांचे प्रयोग पाहतांना अनुभविली आहे.

तेंडुलकरांचा पिंड 'नाटककाराचा'च आहे. तेंडुलकरांचे आजचे हे लौकिक (व अलौकिकही) यश त्यांच्या धडपडीतून, अखंड साधनेतून, प्रयोगशीलतेतून त्यांना साधले आहे. त्यांच्या प्रयत्न–प्रयोगशीलतेला ही मानाची (व मानधनाची) बिदागी लाभली व 'मराठी' तेंडुलकर 'अ. भा.' तेंडुलकर झाले ह्याबद्दल एक मराठी माणूस म्हणून व मित्र म्हणून मला अभिमान वाटतो. आगे बढो ! तेंडुलकर ! ! "

—माधिस्व

[ पान ६३ वरून–दीपमाला ]

परीक्षांचे स्वरूप आले. साहित्यिक वातावरण निर्मितीसाठी त्या परीक्षांचा व वर्गांचा फारसा उपयोग झाला नाही. ह्या परीक्षांना शासकीय मान्यता न मिळाल्याने 'हिंदी' परीक्षांप्रमाणे 'प्रमोशन'चाही स्वार्थ त्यातून साधला जात नाही हा भाग निराळाच !

३) मराठी वृत्तपत्रे, साप्ताहिके, मासिके आणि विविध वाङ्मयीन प्रयोग – प्रयत्न या बाबत आपलेही काही कर्तव्य आहे असे परिषदेला कधी वाटले नाही. त्या प्रयोग-प्रयत्नांची (बरीवाईट) दखलही परिषदेने घेतली नाही. उदा :– किर्लोस्कर मासिके, वसंत, दीपावली यांनी आपापली दीर्घकालीन वाटचाल पूर्ण केली. 'हंस' मासिक रौप्यमहोत्सवी वर्षात पदार्पण करते आहे. काही साप्ताहिके बंद पडली तर 'सोबत'सारखी नवी साप्ताहिके अल्पकाळात आपले व्यक्तित्व मराठी जनमानसावर ठसवू शकली. 'कलाविश्व'सारखे चित्रकलेला वाहिलेले मराठी मासिक उभे राहिले. लघु मासिकांचे नवे प्रयोग चालू झाले. त्यांची माहिती देणे वा बरीवाईट दखल घेणे हे परिषदेचे कर्तव्य नव्हे काय? सर्वच नव्या प्रयत्नांबद्दल एकूण जो दृष्टिकोन दिसतो तो उत्साहवर्धक नाही.

४) परिषद 'काबीज' करणे आणि परिषदेला मराठी साहित्याचे 'पूजा पीठ' बनविणे यातला फरक ध्यानी घेणे अगत्याचे आहे असे मला वाटते.

५) परिषदेला मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांचे एकमेव 'ज्ञानपीठ' हे स्वरूप यायचे असेल (आणि यावे असे मला वाटते) तर ग्रह निरपेक्ष अशा विशुद्ध वाङ्मयीन दृष्टिकोनाची गरज आहे. नवे-जुने, कालचे, आजचे आदि भेदांच्या अतीत परिषद गेली तर ते साहित्यिकांचे मंदिर बनेल, पूजा-पीठ बनेल. साहित्यिकांचा श्रांत माथा तिथे विसावेल.

—सारस्वत








## प्रश्न मिटला, प्रश्नचिन्हे उरली

इतिहासाची पुनरावृत्ती होत असते आणि तरीही इतिहासापासून इतिहास घडविण्याची इतिहासदत्त कामगिरी मोठ्या जिद्दीने व हिरीरीने स्वीकारणारी माणसे इतिहासापासून फारसं काही शिकतात असं दिसत नाही. इतिहास घडविणारांना इतिहासाच्या पानोपानी अभिव्यक्त होणारे व आवाहन करणारे सत्य दिसावे लागते आणि दिसले तरी उमगावे लागते. देशांचे इतिहास आणि देशांची संस्कृती ही काही एक व्यक्ती, एक घटना आणि घटनाधिष्ठित सत्य एवढ्यापुरती मर्यादित असत नाही. उद्याचा इतिहास घडवू पाहणाऱ्या 'आज'च्या लोकनेत्यांना 'काल' विसरता येत नाही. विसरून चालत नाही. जे 'काल' विसरतात (आणि गाफिल राहतात) त्यांना 'काल' क्षमा करीत नाही आणि आज, याचि देही त्यांना त्या 'काल' विस्मतीचे प्रायश्चित्त मिळतेच मिळते. जीवन हे प्रवाही असते तसाच कालही प्रवाही असतो आणि राजकारणी काल तर अतिप्रवाही असतो. राजकारणातही (धर्माप्रमाणेच) पोथीनिष्ठा उपयोगी पडत नाही. जीवन कुचंबते तसेच राजकारणही कुचंबते. आणि फ्लिट व पॉय्झनांचे फवारे उडवून त्या डबक्यांना देवटाक्यांची कळा देण्याचे प्रयत्न अयशस्वी व अंती हास्यास्पदच ठरतात.

'चंदीगड'चे प्रकरण, त्यातून निघालेली राजकीय उकल, त्यातून झालेला प्रक्षोभ व घडलेली हिंस्र-हानी, निर्माण झालेली कटुता, तो निर्णय घेताना 'नाही ! धमकीपुढे मी नमणार नाही' ह्या नाटकाचा झालेला 'दिल्ली'कर प्रयोग या साऱ्या गोष्टी पाहिल्या की, काही वेळा हसावे की रडावे तच कळेनासे होते. आणि 'चंदीगडच्या' निमित्ताने जे राजकारण खेळले गेले आहे ते पाहिले की, राष्ट्रीय एकात्मतेची पोपटपंची, तत्वनिष्ठा, जातीय वादाला सतत घातल्या गेलेल्या (जाणाऱ्या) शिव्या व 'धमकीला नमणार नाही' यातली 'लक्ष्मीधरी' वृत्ती ह्या साऱ्यांचे दर्शन घडते. ते दर्शन 'विनोदी' असले तरी विवंचना उत्पन्न करणारे आहे. आणि आंध्र-निर्मितीपासूनचा सारा भाषिक राज्यांचा इतिहास डोळ्यापुढे उभा राहतो. भाषिक राज्यांपायी या देशाच्या जीवित-वित्तांची, ऐक्यभावनेची जी हानी झाली वा होत आहे ती पाहिली की, कुठल्याही वरदानाचे शापात रूपांतर करण्याची किमया जणु ह्या मातीला गवसली आहे की काय अशी साधार शंका वाटते, भीती वाटते. 'भाषिक राज्ये' ही आज तरी शाप ठरली आहेत आणि जाती, पंथ, निष्ठा, संकुचित पंथभेद यांनी आधीच पोखरल्या गेलेल्या ह्या समाजाला आत्मघाताचे एक नवे शस्त्र त्याने मिळाले असे मोठ्या उद्वेगाने म्हणावेसे वाटते. ब्रिटिशांच्या विरुद्ध लढताना, आसेतु हिमाचल एकसंध भारत उभा राहू शकला. परंतु आत्मविकासासाठी पुढे करण्यात आलेल्या भाषिक राज्याची सोय मात्र त्याने शस्त्रासारखी आपसात लढण्यासाठीच वापरली. आणि 'मी नमणार नाही' म्हणत म्हणत दिल्लीकर नेत्यांनी त्या शापालाच वरदान व अभयही दिले. प्रांत नको नको म्हणत नवे प्रांत निर्माण केले आणि पंजाब–हरियाणा निर्माण झाले. वाद उरला चंदीगडचा ! त्यासाठी कटुता जणु हाजीपीर-नेफा-सेला-बोमदिलासाठीच ही लढाई चालली होती. पण दर्शनसिंग फेरूमान यांनी ७३ दिवस उपोषण करून मृत्यू वरला. पण चंदीगडची वरमाला काही पंजाबच्या गळ्यात पडली नाही. कारण ? सत्तास्पर्धेच्या तागडीत फेरूमानचे वजन नगण्य ठरले. सत्तेच्या पटावरील प्यादी हलविण्याचे सामर्थ्य ज्यांच्या हाती असते त्यांनाच आज इये देशी, बहुस मान आहे असे दिसते. अन्यथा एका जीवाची अकारण हत्या मखखपणे कां पाहिली जावी ? पण गेली. पण ही प्यादी हलवू शकणारा बलवान नेता उभा राहिला. आत्मदहनाची त्याने घोषणा केली आणि उपोषणही आरंभिले. पुन्हा एकदा 'आंध्र-कालीन' घोषणा दिल्लीहून झाली. 'मी धमकीपुढे नमणार नाही' आणि मग त्या घोषणेचे शब्द विरतात न विरतात तोच निर्णयही बाहेर आला. राजकारणी वाटचाल तेढी असते. तिचे हेतु नेहमीच निर्मळ, स्वच्छ नसतात. पंजाबला चंदीगड देताना सत्तास्पर्धेतले महत्वाचे (व तसे नाजुकही) दुवे लक्षात घेऊन निर्णय घेतले गेले. हरयाणाला फाजिल्का वगैरे हिंदु (विशेषतः जाट) बहुसंख्येचा भाग देण्यात आला. लक्ष्य–अर्थातच उत्तरप्रदेशाचे ! कारण उत्तरप्रदेशातील सत्तारूढ काँग्रेसची अब्रू तूर्त तरी कमलापति त्रिपाठींपेक्षाही 'गयाराम' चरणसिंगांच्या हाती आहे आणि चरणसिंग जाट आहेत. हरयाणातल्या माणसांना खूष करण्यासाठी फाजिलका वगैरेची गावे देताना हिंदु-शिख-जाट आदि जातीय विचारांचे प्राबल्य होते आणि हीच गोष्ट मला अधिक शोकात्म वाटते. आम्ही केवळ भाषिक बेकीच पेरली नाही तर आता जातीय बेकीचीही बीजे पेरीत आहोत. ह्या कृत्याने कदाचित सत्तास्पर्धा साधेलही. पण देशाचे ऐक्य साधणार नाही. पंजाब हे पर्यायाने आता शीखिस्तान झाले आहे. आणि कटुता वाढीस लागल्या तर हिंदु - शीख ऐक्य धारण करणारा पंजाब-हरयाणा हे एक 'स्वप्न' ठरेल.

ह्यां निमित्ताने मला आणखी एका गोष्टीकडे लक्ष वेधायचे आहे ती ही की, धमक्या, हिंसा, लुटालूट, मानव–वित्तहानी झाल्यानंतरच कुठल्याही प्रश्नाकडे लक्ष देण्याची व मग त्यातून बरा (वा थातुरमातुर) मार्ग काढण्याची राज्यकर्त्यांची ही "क्रॉनिक" सवय ह्या प्रकरणानंतर तरी सुटणार आहे काय ? आता शिवसेनेच्या बाळ ठाकऱ्यांनी मार्चची मुदत दिली आहे. 'चंदीगड' प्रश्न धमकीने सुटतो.



अनुक्रमणिका

तेलंगण प्रश्नही ह्याच पद्धतीने सुटण्याच्या मार्गावर आहे. आता तरी सर्वात जुना व सर्व लोकशाहीनिष्ठ मार्गांचे कौल ज्याने मिळवून दाखविले आहेत असा बेळगाव-कारवारचा प्रश्न विनाहानी – विनाधमकी सुटणार आहे की नाही ? ही सीमा-लढ्यांची कसोटी नाही ही तर दिल्ली शासनाच्या लोकशाही–न्यायनिष्ठेची अखेरची कसोटी आहे असे मला वाटते. ह्या विषयावर महाराष्ट्र शासन, मराठी जनता व सीमा भागातील मराठी जनता यांचे एकमत आहे. तरीही प्रश्न कां सुटत नाही ? कारण उघड आहे. सत्तेच्या पटावरील प्याद्यांची उलथापालथ करण्याला आवश्यक असलेले 'वजन' कमी पडते. हे वजन वाढणारच नाही असे नाही. धमक्यांची भाषा हे कुठल्याही प्रश्नाचे उत्तर नसावे असे मानणारांपैकी मी एक आहे. पण ह्या श्रद्धा-निष्ठांना तडे जातात तेव्हा माणसे 'माणूस' रहात नाहीत, त्यांचे काहीतरी वेगळेच रूप जगाला दिसते. ते ह्या लोकशाहीनिष्ठ देशात दिसू नये, दाखवावे लागू नये यासाठी 'चंदीगड' न्याय पद्धती नष्ट होणे आवश्यक आहे. चंदीगडची जाग बेळगावच्या उपयोगी पडेल काय ? याचे उत्तर मागण्याचा प्रत्येक लोकशाहीनिष्ठ भारतीयाला अधिकार आहे. दिल्ली दरबाराचे उत्तर ? वाट पाहू या ! !

## महाराष्ट्र साहित्य परिषद
### ( हीरक महोत्सव )

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे या संस्थेचा हीरकमहोत्सव गेल्या महिन्यात साजरा झाला. साहित्य परिषदेच्या ह्या सोहळ्याचे ऋत्वज होते गृहमंत्री यशवंतराव चव्हाण. चव्हाण राजकीय पुढारी व मंत्री असले तरी रसिक आहेत. कला साहित्यादी गोष्टीतूनच कुठलीही संस्कृती व पर्यायाने ते ते राष्ट्र उभे रहात असते, याची जाण त्यांना असल्याने नाट्यदर्शनापासून ते म. सा. प. पर्यंत त्यांच्याबद्दल एक वेगळी आदराची भावना वसंत आहे. त्यामुळे ना. चव्हाण यांचे ऋत्विजपण हा केवळ मंत्रि–निष्ठेचा भाग वाटत नाही. परिषदेने सत्तरीतल्या काही मान्यवर साहित्यिकांचा ह्या निमित्ताने सत्कार केला हेही योग्य झाले.

परंतु साहित्य परिषदेच्या ह्या हीरक महोत्सवाच्या निमित्ताने परिषदेच्या एकूण स्वरूप कार्यासंबंधी काही विचार व्यक्त करावेसे वाटतात. परिषदेचे कामकाज मी तसे जवळून पाहिले आहे आणि परिषदेच्या राजकारणात नसला तरी कर्मयोगात काही लहान-सहान नात्यांनी माझा संबंध आला आहे. पण हे लिहिताना त्या 'वैयक्तिका'पलिकडे काही 'व्यापक' गोष्टीसंबंधी आज मला लिहावेसे वाटते आहे.

१) परिषद ही मराठी साहित्यिक, साहित्य रसिक–अभ्यासक यांची वस्तुतः पहिलीच प्रातिनिधिक संस्था. साहित्य महामंडळ निर्माण झाले असले तरीही परिषद व हे महामंडळ अजूनही काही एका विशिष्ट गटाची, व्यक्तींची व त्यांच्या राजकारणी क्षमतेचीच प्रतिनिधि राहिलेली आहे. नव्या पिढीच्या प्रयोग-प्रयत्नांची त्यांच्या आकांक्षांची, त्यांच्या अस्तित्वाची, त्यांच्या साहित्यविषयक हालचालींची, त्यांच्या कलात्मक यशापयशाची दखल घेण्याची गरज परिषदेला फारशी वाटली नाही. निदान तसे प्रयत्न झाल्याचे दिसत नाही. साहित्य परिषदेने वाङ्मयाच्या इतिहासाबाबतही, घोषणा करूनही, काही साधले आहे असे दिसत नाही. सत्तरीच्या माणसांचा सत्कार करताना तरुण पिढीतल्या समर्थ आणि नवी क्षितिजे दाखवू शकणाऱ्या लेखकांचाही सत्कार करायला काय हरकत होती ? गिरिशांबरोबरच वसंतराव कानेटकर, यशवंतांबरोबर 'श्रीमान योगी'कार रणजित देसाई, खांडेकरांबरोबर श्री. ना. पेंडसे, जयवंत दळवी (चक्र), मधु मंगेश कर्णिक (माहिमची खाडी), भालचंद्र नेमाडे (कोसला), गो. नी. दांडेकर (कादंबरीमय शिवकाल) (ही काही नावे–स्थलाभावी) द. वा. पोतदारांबरोबर शिवशाहीर पुरंदरे, जुन्या पिढीतील कथाकारांबरोबरच भावे, गोखले, माडगुळकर बंधू, गाडगीळ, चोरघडे, विभावरी आदि मंडळींचा सत्कार झाला असता तर काय बिघडले असते ? साहित्य परिषद ही साहित्याची प्रातिनिधिक गादी असेल तर त्या गादीने ह्या गुणी जनांचा गौरव करायला हवा होता. साहित्यविषयक विचारमंथनासाठीसुद्धा सारे (तथाकथित) नवे जुने एकत्र येणे आवश्यक आहे असे मला वाटते. ती संधि परिषदेला साधता आली असती, पण परिषदेला ते सुचले नाही. असलेच तर निदान घडले नाही.

२) परिषद गेली कित्येक वर्षे साहित्याच्या परीक्षा घेत आली आहे. (त्या मांडवाखालून मीही गेलो आहे) ह्या परीक्षांतून उत्तीर्ण झालेल्या साहित्याभ्यासी व साहित्य परिषद यांच्यात काही एक दुवा निर्माण होणे अगत्याचे होते. पण तसे प्रयत्न झाले नाहीत. त्या परीक्षांना 'विणकाम–भरतकामही येते,' असल्या

[पृष्ठ ६१ वर पहा]



## महाराष्ट्र राज्य नाट्य स्पर्धा

यंदा नववी राज्य नाट्य स्पर्धा पार पडली. नाट्य स्पर्धेत एकूण नऊ केंद्रातून आलेली अठरा नाटके सादर करण्यात आली. ह्या अठरा नाटकातली स्पर्धा वस्तुतः फार चुरशीची व्हायला हवी होती. दरवर्षी तशी ती होते. तर-तम निवडताना प्रेक्षकांना काहीसे गोंधळल्यासारखे होते. निर्णयासंबंधी रसिक-अभ्यासकात पैजा लागतात. आणि निर्णय लागल्यानंतर क्वचित प्रसंगी वादळही उठते. प्रेक्षक-परीक्षक यांचा सूर नेहमी जमतोच असेही नाही. ह्या विसंवादावर मग वरीच 'बिनसरकारी' भाष्ये होत राहतात. पुढील स्पर्धेच्या खूपच आधी वादळ शमते आणि 'पुन्हा तिकडे फिरकणार नाही' अशा प्रतिज्ञा करणारे नट-नाट्य संघ-दिग्दर्शक नवीन उमेदीने स्पर्धेचे नाटक 'तालमीला' घेतात. ह्या स्पर्धांच्या निमित्ताने ज्या मूलगामी चर्चा व्हायला पाहिजेत त्या केवळ बक्षिसांपुरत्या, स्पर्धेच्या निर्णयापुरत्या मर्यादित राहू नयेत असे वाटते. कारण स्पर्धा म्हटल्या की त्यात काही स्पर्धकांना गुणक्रमाने (वा क्वचित 'हवा' निर्माण केल्यानेही) पारितोषिके मिळणार व बाकीच्यांना ती मिळणार नाहीत हे ओघानेच आले. परंतु ह्या राज्य नाट्यस्पर्धातून प्रायोगिक व व्यावसायिक मराठी रंगभूमीचे जे लाभ झाले आहेत त्यांचा, ह्या स्पर्धातून अजूनही जाणवणाऱ्या उणीवांचा, स्पर्धाबाबतच्या काही निकषांचा मूलगामी विचार होणे मात्र अगत्याचे आहे. अन्यथा ह्या स्पर्धा ही एक वार्षिक टूम ठरेल, सरकारी 'देणे' ठरेल आणि मग हे शासकीय 'देणे' वसुलीसाठी सरकारदरबारी जाणे-येणे व धरणे धरणे इत्यादि गोष्टींचा भाव वधारेल. हुमणे 'शेठ' (वा साहेब) व तील परंतु ह्या लहान, मोठ्या गोष्टींपेक्षाही ह्या स्पर्धातून जे काही साधले जाते ते अधिक महत्त्वाचे वाटते. सरकारी कृपा वा अवकृपा, परीक्षकांचे बरे वाईट, पटणारे–न पटणारे कौल ह्या गोष्टी क्षणिक आहेत. जे जे उत्तम आहे त्याला न्याय मिळाला वा न मिळाला (म्हणजे आज) तरी त्या उत्तमाच्या 'न्याया'चा दिवसही उजाडतो आणि कृपेच्या काड्या लावून उभी केलेली नाटके काही प्रयोगातच आडवी होतात, विस्मृतीत जातात. इतिहासातही त्यांची नोंद उरत नाही. (अपवाद फक्त सरकारी नोंदीचा–स्पर्धेची नोंद ठेवावीच लागते)–ह्या संदर्भात "शांतता ! कोर्ट"चे स्मरण व्हावे.

३ जानेवारीला ही स्पर्धा सुरू झाली व दि. २३ ला ती संपली. परीक्षक म्हणून श्री. ग. रा. कामत, राजा बढे, र. शो. सरदेसाई प्रा. जोग व देऊळकर यांनी काम केले आणि 'वल्लभपूरची दंतकथा' ह्या थिएटर युनिटच्या नाटकाला पहिले व 'मना त्वाचि रे' ह्या आर्टिस्ट कंबाइन, ग्वाल्हेर या संस्थेच्या नाटकाला दुसरे अशी दोन पारितोषिके जाहीर केली. दंबद्वीपचा मुकाबला (रंगायन), ग्रँड रिडक्शन सेल (उदयकला केंद्र) आणि मेरु मंदार धाकुटे (रंजन कलामंदिर–नागपूर) या नाटकांना उत्तेजनार्थ पारितोषिके देण्यात आली आहेत. ह्या स्पर्धेत सादर केल्या गेलेल्या नाटकात चक्रावर्त (वसंत कामत) व ग्रँड रिडक्शन सेल (शं. का. नवरे) ह्या दोघांनी लेखनाची पारितोषिके पटकावली आहेत. ही दोन्ही नाटकेही आपापल्या परीने लेखनाची व प्रयोगाची आव्हाने होती. आणि त्यांचे आव्हानक प्रयोग तितक्याच जिद्दीने सादर करण्यात आले. (विस्तृत परीक्षणे डिसेंबर–जानेवारीच्या 'दीपावली'त लिहिली आहेतच) ह्या दोन्ही गुणी नाटककारांना लेखनाची पारितोषिके देऊन परीक्षकांनी त्या आव्हानांना 'न्याय' दिला आहे असेच म्हणता येईल.

अंतिम स्पर्धेपर्यंत येणाऱ्या संस्थात काही नावे आता स्थिरावली आहेतसे दिसते. रंगायन, उदयकला केंद्र, वेस्ट कला क्रीडा मंडळ मुंबई; मित्र सहयोग, ठाणे; वरेरकर नाट्य संघ–बेळगाव; रंजन कला मंदिर, नागपूर; बंगाली असोसिएशन, नागपूर; आर्टिस्ट कंबाइन, ग्वाल्हेर ही काही नावे. बंगाली असोसिएशनचा खास उल्लेख करायला हवा. तंत्र, टीमवर्क, भाषेच्या अडचणीवर केलेली मात व काही नवे चित्रण करण्याची जिद्द ह्या गोष्टी त्यांच्याजवळ दिसतात. यंदाच्या नाटकात भाषांतरे–रूपांतरे होती. पण स्वतंत्र नाटके अधिक होती हे महत्त्वाचे व आशादायक. चक्रावर्त, दंबद्वीपचा मुकाबला, ग्रँड रिडक्शन सेल, हा खेळ सावल्यांचा, भाळी लिहिले, कुणा न कळले, रात्र संपली पण उजाडले कोठे?, घन अपुरे, मना त्वाचि रे आदि नाटकांचा ह्या संदर्भात उल्लेख करता येईल. वेगवेगळी नावे धारण करून यापूर्वीच मराठी प्रेक्षकांपुढे आलेल्या 'द एनिमी ऑफ् द पीपल्'चे नवे रूप पुन्हा पुढे आले (विद्रोही-श्याम फडके) तर रॉबर्ट बोल्टच्या 'अ मॅन फॉर ऑल सीझन्स'चे रूपांतर 'मेरु मंदार धाकुटे' (दारव्हेकर) म्हणून पुढे आले. वल्लभपूरची दंतकथा, रंग आणि अंतरंग ही बंगाली नाटके मराठीत आली–तर 'इम्पॉर्टन्स ऑफ बीइंग अर्नेस्ट'चे एक भिकार रूपांतर (व टुकार प्रयोग) 'लग्नाआधी वारसं' ह्या नावाने (शशिकांता फेम) रंगमंचावर आले. ह्या नाट्यप्रयोगाला आळतेकर-कोल्हटकर स्पर्धेत अग्रक्रम मिळाला हे पाहून–वाचून मात्र मन थक्क झाले. परीक्षक–जे कुणी असतील ते–धन्य होत !

चालू राजकारणावरचे व्यंग्य-नाट्य 'दंब द्वीप'मध्ये पहायला मिळाले. तर एक भेदक सामाजिक व्यंग्य-नाट्य "ग्रँड रिडक्शन"–मध्ये पहायला मिळाले. रंग आणि अंतरंगमध्ये पहिल्याच दृश्याने मोहिनी घातली. पण नंतर ते नाटक अपेक्षा पूर्ण करू शकले नाही. कैद्यांच्या कैफियती (व त्यांसाठी मेलो ड्रामा असलेले फ्लॅशबॅक) पाहून-ऐकून ती एक 'डॉक्युमेंटरी' असल्याचा भास होत होता. 'मुकाबल्यात' चर्चा फार, तर यात 'कैफियती' फार. त्यांचा रंग साधारण सारखाच. गुन्हेगार मुळात चांगले असतात. आम्ही (यान समाज) त्यांना गुन्हेगार बनवतो व मग तिथेच डांबून ठेवतो–बांधणी शिथिल. सैल व वरीचशी 'मेलो ड्रामा' असलेली ! काही प्रकार तर फारच पोरकट होता. वरेरकर नाट्यसंघ–बेळगावने 'पराधीन' सादर केले. पण यंदा मेळ जमला नाही येवढे खरे. प्रयोग





पडला नाही. पण अपेक्षित उंचीवर चढलाही नाही. नाशिकच्या लोकरंजन कला केंद्राने 'अबोल झाली सतार' सादर केले. प्रयोग सुन्दर, देखीव. किशोर काकडे, गजानन बेणी व कु. इंदुमती जाधव यांचा खास उल्लेख करायला हवा. 'रात्र संपली, उजाडले कुठे ?' हे संपूर्ण स्त्रियांचे असे नाटक नाशिकच्या स्त्रीमंडळाने पेश केले. हा प्रयत्नच मुळात नवा. म्हणून स्त्री मंडळ व डॉ. सुमन माटे यांचे अभिनंदन. ह्या सर्व नाटकात खूप अपेक्षा वाढविणारा आणि अंती काहीशी निराशा करून गेलेला प्रयोग म्हणजे 'मेरु मंदार धाकुटे' चा. लेखक-दिग्दर्शक दारव्हेकर होते. ह्या प्रयोगात सफाई होती. भव्यता होती–सेटची व काही अंशी विषयाचीही ! परंतु राजा पाठक यांची आचार्य सत्यपालची प्रवचने सुखद (व विचारणीय) वाटली तरी नाटकाला गती देऊ शकली नाही. तूर्त 'समाजवादा'च्या नावाचे एक नाटक दिल्लीला चालू आहे. त्याचेही काही पडसाद सूक्ष्मतेने जाणवले. पण स्पष्ट झाले नाहीत. धर्मसत्ता व राजसत्ता ह्या आपल्याकडे तशा भिन्नच राहिल्या असल्याने व एक पत्नी जिवंत असता राजाने दुसरी पत्नी करू नये असा काही नियम इकडे नसल्याने त्या विषयातून येवढा तीव्र संघर्ष व तीव्र शोकांतिका उत्पन्न होऊ शकते या विचाराशी प्रेक्षक समरस होऊ शकला नाही. राजा पाठक हे कसबी नट, पण भूमिका चांगली वठवूनही ते आचार्य सत्यपाल वाटले नाहीत हे नमूद करणे भाग आहे.

## आता निर्णयासंबंधी—

हा निर्णय समाधानकारक नाही. कुठेतरी, काहीतरी गडबड आहे असेच सतत जाणवत राहते. 'वल्लभपूरची दंतकथा' ह्या नाटकाने यंदा चांगली हवा उत्पन्न केली होती व ती सार्थ ठरली. परंतु 'मना त्वाचि रे 'ला दिले गेलेले दुसरे पारितोषिक मात्र कुठल्या कसोट्यांवर देण्यात आले ते समजले नाही. 'चक्रावर्त'ला लेखनाचे पहिले पारितोषिक दिले जाते व त्याच्या ह्याहून सरस व समर्थ अशा प्रयोगाला पहिल्या पाच क्रमांकातही स्थान मिळत नाही हा चमत्कार वाटतो. 'चक्रावर्त'ला दिग्दर्शन, नेपथ्य, भूमिका व लेखनाची चार बक्षिसे मिळतात पण 'उत्तेजनार्थ'ही क्रम मिळत नाही हा प्रकार तर्कदुष्ट वाटतो. 'मेरु मंदार' तर सर्व अर्थानी तसे 'धाकुटे'च होते. मग त्याचा क्रम लागतो –चक्रावर्तला डावलून लागतो–हे केवळ अतर्क्य आहे. 'मना त्वाचि रे' हे खास परीक्षकीय' 'फाइंड' आहे असेच नाइलाजाने म्हणणे भाग आहे. सारी बक्षिसे मुंबईत (वा परिसरात) राहू नयेत म्हणून तर ही 'राजकारणी' तडजोड केली गेली नाही ना ? मग नागपूरही हवे व ग्वाल्हेरही हवेच असे तर ठरले नसेल ? राजकारणात विभाग, जिल्हावार 'मंत्रिपदां'ची खिरापत मिळाली नाही तर माणसे रुसतात. तसेच निकष कलाविषयक स्पर्धात तर लावले जात नाहीत ना ? शंका येते. स्पर्धेत साऱ्यांचे समाधान करणे कठीण असते हे मलाही समजते. परंतु म्हणून चांगल्या प्रयोग-प्रयत्नांना अन्याय व्हावा असेही मला वाटत नाही. चक्रावर्त हे विषय, निर्मिती, अभिनयादि अनेक बाबतीत आव्हान होते. आणि म्हणूनच चार बक्षिसे मिळूनही त्याला 'क्रम' मात्र मिळू शकला नाही ह्याबाबतचे कोडे तसे उलगडणे कठीण ! शं. ना. नवरे यांचे नाटकही असेच एक आव्हान होते. त्याला क्रम मिळाला हे उचितच. पण 'मना त्वाचि रे'-च्या दुसऱ्या क्रमांकामुळे न्यायाची उतरंड बरोबर साधलीसे वाटत नाही. तरीही स्पर्धकांचे, विजेत्यांचे, नव्या उमेदीच्या नाटककारांचे व महाराष्ट्र शासनाचे व समितीचे प्रमुख राजाराम हुमणे यांचे मी अभिनंदन करतो. तुमच्या मुळेच तर ह्या रात्री रंगल्या !!

—चित्रगुप्त

[पान ८ वरून–झिला ...]

म्हाताऱ्यानं रस्त्यातच बपकल मारली.

"आज्या, तू काळजी करू नकोस." बाबलीकाका समोर उकिडवा बसला. धुळीत रेघोट्या ओढू लागला, "सरदारणीला गड म्हटल्या लख्ख ममईकरीणच हवी ...

मोठा आजा देवासारखा गदगदला, "बरूबर, बरूबर ! ममईकरीणच – काय झिला ?"

"म्हटल्या ही असणार ममईला." मी माहिती दिली.

बाबलीकाका बोलला, "अरे ममईला आपनी आऊ नाय– म्हालक्ष्मीला."

"पतिर टाक. एक ममईकरीण धाड म्हून." मी म्हटलं.

"खुळाच खुळा!" मोठा आजा मोठ्यानं हसला, "झिला, हे मर्दाचं काम, कागदाचं नाय."

आपण नामर्द नाही ही एक गोष्ट सिद्ध करायला गावढा बाकी लाख गोष्टी करील.

"झिला, मेल्या इचार करायचा आम्ही. तो केला. " बाबलीकाकाची टकळी चालू झाली. "तुजं कालीज गेलं तेल लावत. पहिली एसटी धर. ममईची."

मी म्हटलं, "पुन काका हे सांग – ममईला लै बायका असणार.'

"आपल्याला फकस्त एकूच हवी, झिला." बाबलीकाका.

"या त्या, अशातशा, इकुडल्या तिकुडल्या, अव्वासव्वा – तर सांग, ह्यातून ममईकरीण वळखावी कशी ?" मी प्रश्न केला.

बाबलीकाका विचारात पडला. काडीनं पुन्हा जमीन उकरू लागला.

खराच टाळक्याचा बाकी जब्बर. म्हणून ह्यानं उत्तर काढलं. "अरे इझी, बिल्कुल इझी ! आपल्या कोकणात बायका मोग्यावर पदर नाय काढत. मात्र खाली कासोटा मारतात. बरूबर ? तिकडे घाटावर बायका डोईवर पदर घेतात. पुन कासटा नाय खोचत. बरूबर ? ममईच्या बायकांना पदरबी नाय, कासटाबी नाय. तर ही अशी गंमत हाय. झिला, एक नजर सरळ असली, तर ममईकरीण सरळ वळखता ईल."

* *

भाग नवसाची काठी परतून कपाळावर आदळली. ह्यानं माझं कॉलेजातलं पडस्तान उचललं. दोन दिवसांनी पहाटे ते ममईच्या एसटीत टाकलं. रातला दहाच्या सुमारास मी ममईत टपकलो. बाबलीकाकानं सोबत बघूनच धाडला होता. ह्यानं टॅक्सीत घालून मला महालक्ष्मीला आऊआतेच्या नवऱ्याच्या खाणावळीत नेऊन सोडला.

जिजीभाऊ – म्हटल्या माझ्या आतेचा नवरा–कामाच्या गर्दीत होते. माझ्याकडे बघून हात उडवीत हे ओरडले, "हाऊसफुल साहेब! एकदम नो रूम –"

"जिजीभाऊ, मी झिला," मी ओळख दिली.

फुकट. त्यांचं लक्ष नव्हतं. ते बाकी सगळीकडे होतं. तर, मी दारातच उभा. पायाशी ट्रंक आणि सामानाची गोणी.

पुन्हा जिजीभाऊंची माझ्यावर नजर फिरली. सवयीनं त्यांनी हात उडवले. म्हटलं, "सॉरी! नो रूम हाऊसफुल....." अरेरे.

अनुक्रमणिका





पुन्हा ओळख पटवण्याचा माझा अपेशी प्रयत्न वगैरे झाला.

असं तरी चार दोन वेळा झालं. आणि मग मी आशा सोडली. गोणीवर अंग टाकलं. ट्रंकेला डोकं टेकलं. कधी डोळा लागला कळलंच नाही.

जागा झालो तर स्वतः जिजीभाऊ मला उठवीत होते. "झिला, जागा झालास ?"

मी दात विचकले, "अखेर वळखलंत तर !

आऊआतेचा हा नवरा, फसफसून हसला, "सॉरी ! माफ कर हो झिला. अरे, आमचा सिझन नाय सुरू झाला ? आता हे असंच चालायचं आहे म्हणून डोचकं म्हणायचं. बाकी असतं आऊट."

जिजीभाऊंनी घंटी दाबली. तिचा वर माडीवर आवाज खणखणला.

जिन्यावरून मुरकत दाद आली. "काय शेट ?"

"अरे बॉम्ब, ह्याला बिऱ्हाडी घेऊन जा."

सिझनच्या गर्दीत जिजीभाऊंना जादा बोलायला सवड नव्हती.

जिजीभाऊंचा हा बॉम्ब आणि मी 'दिलखुशबहार'च्या बाहेर पडलो.

हिच्या डोक्यावर पदर नव्हता. म्हटल्या खालीदेखील कासोटा नव्हता. पहिल्या घासालाच इजिकाची नळी. माझ्यातला गावढा चेकाळला. ह्याला मी दटावलं– मायच्या, दम खा! हाडूक अडकेल घशात !

इतक्यात बॉम्ब उसळला, "माझं नाव बॉम्ब नाही हो. शेट आपली गंमत करतात." ती लुसलुशीत हसली. थबथबीत स्वरात बोलली. "मला सगळे म्हणतात बबिता. ठाऊक आहे का ?"

खरंच मला ठाऊक नव्हतं.

"अहो मी सिनमातल्या त्या बबितेसारखी दिसते. खरं का हो ?"

"एकदम नाय." मी बोललो.

ती जाम नाराज झाली.

"सिनेमातली लोकं खोटी असतात." मी खुलासा केला, "तू खरी हायेस."

"तू ?" कावडी चावावी तशी ती करकरली. "तू म्हणायला बहीण नाही मी तुमची अनाडी, जंगली."

तिनं तोंड फिरवलं. निमूट ती चालू लागली.

बायकांना अहोजाहो करायला आमच्या बापानं आम्हाला शिकवलं नव्हतं.

बबिता. जिजीभाऊच्या दोस्ताची लेक. घराणं अस्सल ममईच्या मराठ्यांचं. हिचा बाप खूप मातबर होता. पण रेसच्या नादानं बुडाला आणि कुठं काय की तोंड काळं करून गेला होता. दोस्ताच्या पोरीला जिजीभाऊंनी लॉजवर ठेऊन घेतलं. लॉजवर रहाण्याची व्यवस्था वर माडीवर होती. तो चार्ज बबितेकडे होता.

आतेकडून ही माहिती मिळवली आणि तिच्या मागं भुणभुण लावली. मग चार दिवसांनी लॉजवर चार ते सहापर्यंत गल्ल्यावर बसण्याची परवानगी मला जिजीभाऊंनी दिली.

"गावठाले, काय बेत आहे ?" पहिल्याच दिवशी बबितेनं सलामी दिली.

"सिझन नाय म्हटलं आपणबी चैन करावी." मी म्हटलं.

"म्हणजे हियं आम्ही चैन करतो ? " तिनं वाकडा अर्थ घेतला. "गावठी झाले म्हणून वाटेल ते नाही हो ऐकून घेणार."

मग अध्यंमध्यं नाही, बरोबर सहाला ही खाली उतरायची. देह जिन्यावरून घमघमाट उसळला. नोकझोक तर असा की बघतच रहावं. म्हटल्या आधी बघत रहावं आणि मग वळवळत बसावं.

"कुठं फिरायला ? " मी बावळटासारखं विचारलं.

"शू: ! विचारू नये." तिनं हसत म्हटलं.

"आणि जिजीभाऊंनी विचारलं तर –"

"शेट विचारणार नाहीत." आणि ती खळखळून हसली. पदर माझ्या तोंडावर मारल्यासारखं करीत म्हटलं, "नग आहात."

नग ?

दहावीत संस्कृतचा भोगले मास्तर खेकसायचा, "झिला गावड्या, बेट्या समास सांग– नग."

आणि माझी मुंडी गळून मेजाच्या खाली जायची.

म्हटल्या ममईच्या पोरीबाळींना समासबिमास सगळं पाठ असतं का काय ?

तर चौथ्या नाही, पाचव्या दिवशी सहाच्या ठोक्याला माझ्या काळजात उभ्याआडव्या सात कट्यारी मारून बबिता बाहेर पडली. आणि मागं मायचा हा समास मला सुटला.

न गच्छति इति – जात नाही तो. म्हटल्या नग. उपपद तत्पुरुष समास.

अंगाच्या बाहेर भली चार अंगुळं शिणीक उठली. तडक मी रस्त्यावर धावलो.

फॅशनवाल्या बायकांच्या त्या कळपात माझं कोकरू कुठल्या कुठं गडप झालं होतं. पाठमोरून ह्या सगळ्या सारख्याच दिसत होत्या. पातळं सारखी, चाल सारखी. तरी दहापंधरा टायम तोंडात खेटरं बसल्यासारखं झालं. तसा मग कान्फिडन्स गेला. खुद्द स्वतःचीच खात्री राहिली नाही. मान खाली गेली. रस्ता हुंगत चालू लागलो.

कान बाकी तिखट.

म्हणून तर बबितेच्या नावानं कालवा झाला आणि मी ठाक उभा राहिलो.

फाटकावर दुतर्फा गर्दी होती. एक छोटी गाडी भुर्कन आगरात घुसली

शिट्या उठल्या. टाळ्या फुटल्या. अचावचा वटवट चालली. आंबट तोंडानं लोकं बाटेला लागली.

तर कोणीतरी उचंबळलं, "आया रे आया ."

"कौन ? " दुसऱ्यानं विचारलं.

"आपली कंट्री बबिता. फिरकी ताणायची जरा ? "

"साल्या त्या कॉन्ट्रॅक्टरनं ताणली असेलच की," तिसरा मध्यं पडला.

"अरे तो भडवा काय नुसती फिरकीच ताणतो ?" आणि ही पोरं फाटकात वाट अडवून उभी राहिली.

"बाजूला व्हा रे !"

"हा आवाज बबितेचा होता. मी ओळखला. तसं माझं पाऊल थांबलंच.

"त्या सिनेमावाल्यांना सांग हे! त्यांच्या तर अंगावर पडतेस." दुसरा बोलला

"किंवा ते तुझ्या अंगावर पडतात—हा: हा:" हा कोण तो घोड्यासारखा खिकाळला.

मी धाडकन् त्याच्या थोबाडावर आवाज काढला.

अनुक्रमणिका







अनुक्रमणिका

तशी तिन्ही पोरं उलटून माझ्या अंगावर धावली. ह्या कुत्र्यांना मी थोडाच दाद देतो. अशा मारामारीशिवाय आम्हा गावड्यांचा एक दिवसही जात नाही. पाच मिनिटात मी त्या तिन्ही पोरांना वाटेला लावली. दोघे तर पळूनच गेले. तिसरा जमिनीवर गयावया करीत पडला.

तोंडावर हात घेऊन मुसमुसत बबिता उभी होती.

हिला मी रागानं म्हटलं, "कसल्या लोकांत वावरतेस ?"

मग दोन दिवस बबितेची गाठभेट झाली नाही. हिला म्हणे बरं नव्हतं. म्हणून वर माडीवरच ती पडून होती.

तिसऱ्या दिवशी सकाळला आतेच्या बिन्हाडी हिनं मला एकीकडे गाठलं. हातात चिठी ठेवली. तोंड उतरलेलं, डोळे सुजलेले, तोंडावर बळेच हसू ओढून ती न्हाणीघराकडे धावली.

तिनं चिठीत लिहिलं होतं, 'मला भय वाटतं. ती पोरं माझा जीव घेतील. तुमचासुद्धा. आजच्या आज गावाला पळून जाऊया–'

मनातल्या मनात भाग नवसाला मी लाख नमस्कार बोललो. आणि मग आतेला म्हटलं, "रातला मोठा आजा स्वप्नात आला गे. जरा बघून येईन म्हणतो."

सांजुला एसटीची रातराणी धरली.

गाडी सुरू झाली तसं बबितेनं खिडकीला डोकं टेकलं आणि खुशाल डोळे मिटून घेतले. म्हटल्या माझी मस्ती जिरली होती. कारण नव्हतंच–आणि तरीही वाटभर माझा काही डोळा लागला नाही.

सकाळी मुक्कामाला उतरलो आणि हिला कसंसंच व्हायला लागलं. 'ओय् ओ ओय्' करीत मध्येच ही बसायची आणि बकाबका ओकायची. वाटेत मी धीर दिला, "भितेस काय ? एसटी लागली-बिगली असेल." तीन मैलांची पायपीट करून गावाच्या वेशीवर आलो तर काजूच्या झाडावरून पुढ्यात ढापकन उडी पडली

'बाबलीकाका–" मी चॅट झालो.

"चार दिवस बसलूंत हिथं, मेल्या, तुझी वाट बघत." बाबलीकाकानं खुलासा केला.

तोवर मोठा आजा दांडा टेकत पुढं झाला. मला बघून म्हाताऱ्याला आनंद झाला. पण मला हे कळू नये म्हणून ह्याने मिशा पिस्कारल्या. घुटूघुटू आवंढे घोटत विचारलं, "झिला, एकलाच रे ?"

"ती काय येती हाय." मी म्हटलं.

दोघांच्याही माना ताठ उठल्या. डोळे बारीक झाले. बोराच्या बाजारात जनावर बघावं तशा नजरेनं बबितेला ते न्याहाळू लागले.

म्हटल्या चांगलं माणूसदेखील ह्या बघण्यानं नरम होईल. ती तर प्रवासानं आधीच नरम झाली होती. अशात ही तपासणी. बबितेनं जागच्या जागी ठाण मारलं. हिच्या पोटात पुन्हा ढवळू लागलं. दोन्ही हातांनी डोकं धरून ती 'ओय् ओय्' करीत पेटके काढीत बसली.

मोठ्या आज्याला मी म्हटलं, "मोटर लागली."

म्हातारा उसळला, "अक्कल नायच. पुन धोरण नरो हवं?"

बाबलीकाकानं मान हालवली, "तेबी नाय."

"म्हटल्या–" मी घोटाळलो, नाराज झालो, जरा चिडलोच.

मोठा आजा हात उगारून अंगावर आला, "आल्या पावली परत जा आधी."

"ममईची एसटी धर. तू आलास हे गावात कळून उपेगाचं नाय." बाबलीकाकाने मत दिलं.

"पण ही –" या भडीमारानं मी गारच झालो.

"ही ? तुझी ही.      " म्हातारा तरातरा बबितेच्या पुढ्यात जाऊन उभा राहिला, "काय गो, कितवा महिना रांडे ? आं ! तिकडे उद्येग केलेस आन पोट जड झालं म्हून ह्याला वढलंस. . . . ."

मोठ्या आज्याच्या पायावर बबितेनं मुळी डोकंच ठेवलं. तिनं गळा काढला. ती कपाळं घेऊ लागली.

म्हटल्या मोठा आजा टपटप ओथंबला, "पोरा, रडू नकोस. चूक झाली. निस्तरायला हवी. इचारलं तर सांग मोठ्या आज्याची भाचेनात–"

"आन घोव गेला अपघातात. गिरणीच्या पट्ट्यात गावला. महिना झाला." बाबलीकाका डोचकं खाजवू लागला.

पुढं आणीक ह्यांची काय बोलणी झाली कुणास ठाऊक ? ऐकायला मी थांबलो नाही. म्हटल्या मिठाच्या बावडीत जाऊन झक् मारली होती मी–

आल्यापाउली मी परत फिरलो. वेंगुर्ल्याला थेट ममईची रातराणी पकडली.

* *

'दिलखुशवहार'च्या पायरीवर कितीतरी वेळ नुसता हसत उभा होतो.

जिजीभाऊ जिन्यावर उभे राहून ओरडत होते, "अरे मामुली काम नाही. प्रिन्सेस – राजकन्या ! तिकडे इंदूर कडल्या. नुसत्या वहाणाच एवं ट्रन्क. म्हणाल्या ह्यांना पालीस करा. कोपऱ्यात कपड्यांचा हा ढीग. पातळं, पोलकी, रुमाल, परकर आणीक काय-काय... ह्यांना इस्तरी कोण करणार म्हणाल्या. मी बाहेर धावलो. तर बेल वाजली. मागोमाग हुकूम – चार वाजता टॅक्सी लागेल. हां म्हणून बाहेर आलो. पुन्हा बेल. म्हणाल्या–कम इन. कमीजाची बटन काढा. डोळे पांढरे व्हायची पाळी आली. आता हूं–असं कसंबसं म्हटलं आणि जिना गाठला . . . . "

दम खायला जिजीभाऊ थांबले. तशी त्यांची नजर माझ्यावर गेली. मला बघून आयुष्यात प्रथमच आज त्यांना आनंद झाला.

"झिला, बटा करेक्ट टायमाला उभा राहिलास. देवासारखाच."

"आं !" मी जरा लाजलो.

"टायमाला उपयोगी पडणार नाहीत तर नाती हवीत कशाला ?" जिजीभाऊंनी वैतागाचा बार भरला, 'तो बबनीचा बॉम्ब कुठं खड्यात पडला देव जाणे ! गेली असेल कोणाचा तरी हात








धरून. तेव्हा गादीवरचा चाज आता तुझ्याकडे! झिला." वगैरे.

सर्वी आली आणि गावडयानं गाढवपणा केला नाही असं कधी झालंच नाही.

हसत-हसत मी जिना चढू लागलो.

आठ नंबरची खोली. दारातून मी म्हटलं, "शेटनी धाडलंय्."

प्रिन्सेस कॉटवर पडली होती. ती पडूनच बोलली, "क्यूं बुड्ढा डर गया ?"

आणि ती एकदम हसत सुटली. ओठाभोवती मोत्यांची माळ चकाकली. हिचा वर्ण तकतकीत गव्हाळ होता. केवडयाच्या पात्यासारखा. तसाच घमघमीत वास अंगाला सुटला होता. नाक थोडं लांबच. डोळे भोकरासारखे भुरकट. अर्धवट निजेत असल्यासारखे जड, सुस्त.

हसतच ती म्हणाली, "धिस इज माय ट्रिक. माणूस नकोसं असलं की मी त्याला कमीजाची वटणं काढायला सांगते. तुझा शेट आता ह्या खोलीकडे फिरकणार नाही."

मी तिला सांगितलं की पॉलिश, लॉण्ड्री वगैरे जादा चार्ज पडेल.

"आय नो. ॲडव्हान्स हवा? शंभरचा चेक देते." तिनं हसून म्हटलं.

"शेटना विचारून सांगतो. .

ती प्रिन्सेस असली तरी शेवटी एक बाईच होती. म्हटल्या काय ते समजा. हिचा जन्म श्रीमंतीत गेलेला. ख्यालीखुशीलीत ह्यात गुदरलेली. अशी माणसं बोलण्यात, चालण्यात आणि वागण्यात अंमळ जादा असतात. तशीच ही होती. आता म्हणून तिचं कसलं कौतुक करायचं ?

जिजीभाऊंनी मात्र तेच खूप चालवलं होतं. रोज सकाळला पॉलीशवाला आणि लॉण्ड्रीवाला खेप टाकून जात. टॅक्सीवाला तर लॉजच्या समोर उभा राही. प्रिन्सेस चेक देत होती. जिजीभाऊंनी तो घेतला नाही. माझ्याकडे निरोप धाडला, "प्रिन्सेसकडून ॲडव्हान्स ? धंदा घातला म्हणून सगळंच विकलं नाही."

ती बहुतेक अख्खा दिवस बाहेर असायची. मोठं माणूस. हिच्या लाख ओळखी. हजार ठिकाणं. रात्रीबेरात्री ही लॉजवर परतायची.

नेहमीच नाही, एखाद दिवस नीज येत नसली की हिच्या खोलीत बेल वाजे.

मग हिच्या गप्पा चालू होत.

हिचा बापाशी तंटा होता. कारण हिच्या मनाविरूद्ध हिज एक्स्लन्सीनं हिचं लग्न ठरवलं होतं. असाच कोणी फलाणा प्रिन्स गाठलान् होता. साखरपुडा उद्या तर आधल्या रातला प्रिन्सेस पॅलेसमधून बेपत्ता. अजूनही पेपरात जाहिराती येत. हिचे फोटो येत. हिचा पत्ता लावून देणाऱ्यास हिज एक्सलन्सी चांगलंच बक्षीस देणार होता.

मी हिला एकदा म्हटलं, "ज्याला त्याला असं सांगू नका. कोणी पोलिसांना कळवील."

तिनं माझ्याकडे रोखून पाहिलं. मग कोरडेपणानं म्हटलं, "फक्त तुलाच सांगते. देअर इज रीझन. आय वॉन्ट यअर हेल्प. कदाचित पोलीस तपासाला येतील."

प्रिन्सेसचा माझ्यावर विश्वास होता तर—फक्त माझ्यावरच. गोष्ट महत्त्वाची होती. काळजात खास कप्पा करून मी ती जपून ठेवली. येरीयेरवाळी काही नाही तरी ह्या गोष्टीचा विचार करीत बसायचो. आणि मग दुसरं काही नाही तरी वेळ कसा गेला कळत नसे.

त्या दिवशी तर प्रिन्सेसला भलतीच लहर आली.

एकाएकी बोलता बोलता ती कावरीबावरी झाली. कॉटवर उपडी पडून तिनं उशीत तोंड खुपसलं. तशीच निपचित पडून राहिली.

मी घाबरलो. पंखा लावला. गरम कॉफी घेऊन आलो.

कॉफी पिऊन हिला जरा बरं वाटलं. ती पुटपुटली, 'मला भीती वाटते रे — या एकटेपणाची."

मी म्हटलं, "एकटया काय म्हणून. मी आहे तो.

तू आहेस आणि नाहीस !"

"म्हटल्या — "

"कसं सांगू ? लहान नाहीस तू —" आणि ती हसली, "बच्चा कहानी सुनाऊं ? वाडयावर माझ्या तैनातीस एक कुळंबीण होती. सालस बाई. कामसू. देखणीसुद्धा. नवऱ्याला हिचं रूप बघवलं नाही. तिच्या तोंडावर त्यानं डाग दिले. ते विद्रुप कोणाला दिसू नये म्हणून ही पदरानं सगळं तोंड झाकून घेई. माझ्यावर तिचा खूप लोभ होता. वेणीफणी, न्हाणंधुणं, नटणंथटणं – माझी सगळी कामं ही कुळंबीणच बघे. तरी चारपाच वर्षं ती वाडयावर होती. मग एक दिवस सी. आय. डी. ची माणसं आली. दुसऱ्या कोणाला नाही, त्यांनी ह्या कुळंबीणीलाच धरलं. हिच्या तोंडावरचा पदर ओढला. तर- काय सांगू ? ती बाई नव्हती. बुवा होता. आणि त्याच्यावर बलात्काराचो चार्ज होता. ह्याला धरल्याचं मला दुःख नाही. पण ह्यानं मला सरळ कशी सोडली – का सोडावी ? मी लहान नव्हते काही. आजही ह्या गोष्टीचं मला दुःख होतं. वाटतं माझ्यातच काही दोष आहे. तुम्हा पुरुषांना मी तशी हवीहवीशी वाटतच नाही."

आणि प्रिन्सेस वेडयासारखी हसत सुटली. मग एकदम माझ्या अंगावर ओरडली, "गेट आऊट यू फूल !"

एक दिवस संध्याकाळी तिचा फोन आला, "पोलिसांना पत्ता लागलाय. चार दिवस मुंबई सोडावी लागणार. . "

मी सुचवलं, "गावालाच चला आमच्या. पोलिसांनाच काय, त्यांच्या कुत्र्यांना पण पत्ता लागायचा नाही."

"तिकडे गावाला नेऊन माझ्याशी काय पाट लावणार आहेस









अनुक्रमणिका

तिनं चेष्टा केली, "अच्छा ! तू म्हणतोस तर येते. पहाटच्या एसटीनं निघायचं. माझी सूटकेस तेव्हढी घेऊन ये. बॉम्बे सेंट्रलवरच भेटेन. बाय, बाय !"

त्या खेपेला गावात कुत्र्यांनी आमचं स्वागत केलं. कारण आम्ही पोचलो तेव्हा मध्यरात्र उलटली होती.

बावलीकाकाच्या माडीवर प्रिन्सेसची मी व्यवस्था केली.

"पुन झिलाशी ही लगीन लावील ?" बावलीकाकाची माशी शिंकायची.

मोठा आजा ती हाकायचा, "नायतर झक मारायला आली ह्याचा हात धरून ?"

मी ह्यांना आवरायचो, "बोंवला, मोठ्यानं बोंवला. उद्या गावात झालं, पोलीस आले का मग माझ्या नावानं बोंबला."

तर मांझीच बत्तिशी बाधली. तिसऱ्या दिवशी रात्रप्रहरालाच बावलीकाकाच्या बोंबा ऐकून आवाठा ह्याच्या घरावर जमा झाला.

खळ्यातच बावलीकाका गडाबडा लोळत होता. आकान्त करीत होता, "बुडालो, शाप वाटुलं झालं माझं. माझ्या बायकूचा दागिन्यांचा डवा रांडेनं पळविला."

मोठा आजा भांवावून कपाळाला हात लावून बसला होता.

मी समोर दिसलो मात्र आणि तसा समोरचा दांडा उचलून म्हातारा माझ्या मागं लागला. "भांचोद, नालायक ! काळं कर जा आवाठ्यातून ."

* *

जीव देण्याचा बेत करीत थेट मुंबईपर्यंत थडकलो. शुद्धीवर नव्हतोच म्हणून तर वाटेत एका पोरीस वाचविलं. बसखाली येत होती. हाताला धरून मी मागं खेचली.

ती माझ्यावरच उखडली, "का वाचविलंत मला."

"जीव द्यायला काय रोग झालाय?" मीसुद्धा चिडून विचारलं.

ही हमसाहमशी रडायला लागली. म्हणाली, "ज्याच्यावर विश्वास टाकून बापाचं घर सोडलं त्यानंच गळा कापला. आता कशी जगू मी ? कोणासाठी ?". वगैरे खूप काही.

मी म्हटलं, "माझ्याबरोबर चल. जगायचं का, कोणासाठी आणि कसं ते कळेल."

ती निमूट आली. करणार काय ? ह्या अफाट मुंबईत हिच्या ओळखीचं कोणी नव्हतं. जवळ फुटका दमडा नव्हता. हिचा तो कोण तो त्यानं तशी चोख व्यवस्था केली होती.

तर ही मागं, मी पुढं—आम्ही दोघं 'दिलखुश बाजार'मध्ये शिरलो.

गल्ल्यावर जिजीभाऊ कपाळावर बर्फाची पिशवी घेऊन बसले होते. ह्यांचं ब्लड प्रेशर चढलं होतं. मला बघून ते आणीकच चढलं. बाजूच्या टोपलीतली केळी, टोमॅटो वगैरे वस्तू हे माझ्यावर फेकून मारीत सुटले. अशी परिस्थिती. आम्ही पुढल्या दारानं पळ काढला. आणि मागल्या दारानं भटारखान्यात घुसलो. पोटभर खाल्लं, चहा प्यालो. मग आतेच्या बिऱ्हाडी आलो. तर हिनं दारातंच फतकल मारली. गावड्याची लेक. आतेनं भलाभक्कम सूर लावला. म्हटल्यां, आजूबाजूची बिऱ्हाडं गोळा होऊ लागली.

छा: ! हिथं तंबू टाकणं कठीण होतं.

डोक्यात विचार आला ह्या मुंबईत आता कसं, कोणासाठी आणि का रहायचं ? पाकीट उघडून हिशेब केला. जेमतेम पंधरा रुपये होते. बस्स ! एस.टीची दोन तिकिटंसुद्धा सुटत नव्हती. जनताच खरी. विनतिकिट. दादरला ती धरली. प्रथम तिला [illegible]त गाठोड कसं कोंवली. मग मी चढलो. इलाजच नव्हता.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी आम्ही मुक्काम व पोस्ट वडखोल. गाठलं. मुद्दामच मोठ्या आज्याच्या दारावरून हेलपाटा मारला. म्हातारा आणि बावलीकाका बाहेर ओसरीवर गुडगुडी ओढत बसले होते. पाहून मी न पाहिल्यासारखं केलं. ह्यांना ऐकू जावं म्हणून मोठ्यानं बोललो, "ए, हे आपलं गाव. ते समोर आपलं घर."

आणि फाटकावरून ओरडलो, "आये, तुझ्यासाठी मंमईहून एक गंमत आणलीय्."

तर आये बाहेर यायच्या आधी मोठा आजा आणि बावलीकाका हजर झाले.

मोठा आजा मोठ्यानं हुंकारला.

बावलीकाका मुंडी उडवीत बोलला, "झिला, मेल्या फुकाट तरास झाला तुला. आन् माझी नुकसानी. ज्ञानू घोगळ्याचा कालीजवाला पोरगा निवृत्ती गावातच हाय. लगिन फिसकटलं म्हणतात."

मी त्याच्याच आवाजात म्हटलं, "फुकाट नाय तरास गेला काका. लै गोड फळ मिळालं."

आणि मी हसत तिच्याकडे पाहिलं.

पण तिचं माझ्याकडे लक्ष नव्हतं. निजेतून उठल्यागत डोळे चोळीत ती बावलीकाकाला बोलली, "काय म्हणालात तुम्ही ? निवृत्ती घोगळे या गावात आहेत ?"

मोठ्या आज्यानं जाव केला, "भडवा जाणार कुठं नायतर ? ह्याच गावचा तो."

तर ती केळीसारखी मोठ्या आज्याच्या पायावर कोसळली. डोळ्यातून गंगायमुना वगैरे सगळ्या नद्या वाहू लागल्या. तोंडानं भटासारखा एक हा मंत्र, "आजोबा, मला त्यांच्याकडे पोचवा...."

मी ओरडत होतो, "नाही. मी तुला त्याच्याकडे जाऊ देणार नाही. एकदा त्यानं तुला फसवलं. आता तर जीव घेईल तो......."

पण माझं ऐकतो कोण ? प्रत्यक्ष जल्माच्या बापानंच माझा गळा दाबला. आणखी चारचौघांनी खाटीवर पाडून मला सुंभानं बांधून टाकलं.

मग पिवळा ठेवणीतला कोट घालून मोठा आजा आला. डोईला जरीचा लाल शेमला होता. हातात चांदीच्या मुठीची काठी होती. बावलीकाकासकट 'पांढरपंधरा गावडे सगासुदीचे कपडे घालून तयार झाले. कोणीतरी हुसेन तासेवाल्याला बोलवायला धावलं.

तयारी झाली तसा मोठा आजा हिला म्हणाला, "चल बये, तूस घरला पोचवून देतो. म्हटल्या शिवाजीराजानं मुसलमानाच्या सुनेला खणचोळी करून असंच पोचिवलं होतं. . . ."

बावलीकाकाचा आवाज आणीकच वाढला, "अरे हे दुसरं उदाहरण. घोगळ्याची बाई गावड्याचा हात धरून गेली. दिडशे वर्षांनी घडलं. मेल्या झिलानं तो पराक्रम केला. उद्या गाव घोगळ्यांच्या तोंडावर थुंकेल......."

तिकडे खाटीवर मी हाताच्या मुठी वळवीत होतो. दातओठ खात होता, "गावडे आन् घोगळे — मरू देत सगळे साले ! खड्ड्यात जाऊ देत. . . . . !"

• • •







अनुक्रमणिका

